


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका
वर्ष ३० । अंक २ । उन्हाळा २०१२

कोणतीही भाषा न समजणाऱ्या काळात
कवितेचं प्रारब्ध
आपल्या प्रारब्धासारखंच
स्तब्धता घेऊन आलेलं आहे
आणि आपण झालोय
एकमेकांशी संबंध नसलेल्या शब्दांसारखे परके,
एकाच ओळीत असूनही.

- वसंत आबाजी डहाके

अनुक्रमणिका






संपादक : नीलिमा गुंडी
संपादकीय-सल्लागार : अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
संपादन-समिती : नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर
संपादकीय पत्रव्यवहार : नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता : आनंद काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. चलभाष : 094216 10704
मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 093731 04093 **विजय पाध्ये** - 098220 31963. marathiabhyaparishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) वार्षिक वर्गणी

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| व्यक्ती : | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| संस्था : | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र०** 20057164260 या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/-, शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

प्रकाशन : त्रैमासिक; जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**मुखपृष्ठाविषयी :**

मुखपृष्ठावरील ओळींचा संदर्भ : 'अदृष्टाचं काव्यशास्त्र', 'शुन:शेप', (वसंत आबाजी डहाके), लोकवाङ्मयगृह, मुंबई, आवृत्ती दुसरी, १९९८, पृ० २३-२५

---

# अभिनंदन

कविवर्य **ग्रेस** यांना त्यांच्या 'वाऱ्याने हलते रान' या ललित लेखसंग्रहाला साहित्य अकादमी (नवी दिल्ली)चा पुरस्कार प्रदान करण्यात आला आहे. या पुरस्काराच्या निमित्ताने वैशिष्ट्यपूर्ण शैलीमुळे लक्ष वेधून घेणाऱ्या एका मनस्वी कलावंताला उचित असा सन्मान प्राप्त होत आहे. ग्रेस यांचे मराठी अभ्यास परिषदेतर्फे मन:पूर्वक अभिनंदन!

---

# आवाहन : १

'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाचा एक अंक या वर्षी 'बोली विशेषांक' या स्वरूपात काढावयाचा आहे. त्यासाठी अभ्यासकांकडून लेखनसहकार्य अपेक्षित आहे :

लेखनप्रकार :

(१) महाराष्ट्रातील विविध बोलींमधील शब्द/वाक्प्रचार/म्हणी यांविषयीच्या कोश-कार्याची माहिती.

(२) बोलींच्या जतन-संवर्धनविषयक उपक्रमांची माहिती.

(३) बोलींविषयी भाषावैज्ञानिक, तसेच सांस्कृतिक अंगाने केलेले संशोधनपर लेखन.

(४) बोलींमधील वैशिष्ट्यपूर्ण साहित्यकृतींचा परिचय करून देणारे लेखन.

(५) प्रमाणभाषा आणि बोली यांच्यातील संबंधावर अभ्यासपूर्ण भाष्य करणारे लेखन.

टीप : कृपया संपादकीय पत्रव्यवहारासाठी बदललेला पत्ता लक्षात घ्यावा.

---

# आवाहन : २

आपण 'भाषा आणि जीवन'चे वाचक आहात. आपण परिषदेसाठी पुढीलप्रकारे सहकार्य करू शकता :

(१) स्वत: नियमित वार्षिक वर्गणी भरणे, वर्गणीदार मिळवून देणे.

(२) परिषदेचे आजीव सदस्यत्व स्वीकारणे.

(३) लेखनसहकार्य करणे.

(४) आपले महाविद्यालय आणि मित्रपरिवार यांना परिषदेशी जोडणे.

(५) परिषदेला देणगी देणे.

---



अनुक्रमणिका

# केल्याने रूपांतर...

विजय पाध्ये

आपल्याकडील केवळ हाताच्या बोटांवर मोजण्याएवढ्याच साहित्यिकांनी आपल्या प्रतिभेकडे उपजीविकेचे साधन म्हणून पाहिले आहे. स्वतंत्र साहित्याच्या तुलनेत पाश्चात्त्य साहित्याचा अनुवाद करून तो आपल्या समाजासाठी उपलब्ध करून देण्याची संकल्पना विशेष करून अलीकडील काही वर्षांत लोकप्रिय झाली आहे, हे ज्या वेगाने व व्याप्तीने अनुवादित साहित्य प्रकाशित होत आहे त्यावरून सिद्ध होते. अनुवादाकडे व्यवसायाचे, योगक्षेमाचे एक साधन म्हणून पाहिले जात आहे आणि विद्यापीठांनीही त्याची दखल घेऊन आपल्या अभ्यासक्रमांमध्ये भाषांतरविद्येचा समावेश करून विद्यार्थ्यांनी भाषांतराकडे व्यवसायाचे एक प्रभावी क्षेत्र म्हणून पाहिले जावे अशा हेतूने शैक्षणिक उपक्रम चालू केले आहेत.

अर्थात, केवळ दोन भाषा अवगत असणे वा लेखन-वाचनाची आवड असणे एवढ्याच निकषांची पूर्तता करणारी व्यक्ती, कितीही योजनाबद्ध व शास्त्रशुद्ध अभ्यासक्रम असला तरी तो पूर्ण करून भाषांतरकार म्हणून उदयाला येऊ शकत नाही. भाषांतरकाराला ज्याप्रमाणे आपल्या भाषेविषयीची उत्तम समज हवी, त्याप्रमाणे मूळचे साहित्य ज्या भाषेतले आहे, त्या भाषेचे, त्या भाषिक समाजांमधले, संस्कृतींमधले बारकावे माहीत हवे. किंबहुना ती प्राथमिक व मूलगामी गरज आहे, कारण ज्या साहित्याचे आपण भाषांतर करणार आहोत त्यात वर्णन केलेले लोकजीवन, स्थलकालादी परिस्थिती ही भाषांतरित कृती वाचणाऱ्या व्यक्तीला मनापासून भावली पाहिजे, मूळ कृतीचा रसास्वाद घेता येऊन ती अंत:करणाला भिडली पाहिजे. असे झाले तरच आपली भाषांतरित कृती यशस्वी झाली असे म्हणता येईल. म्हणूनच भाषांतरित कृतीपेक्षा रूपांतरित कृती ही उजवी ठरते.

ज्या समाजात आपली संकल्पना वा विचार रुजवायचा त्याची संस्कृती वा चालीरीती, आपल्या संस्कृती वा चालीरीतींहून भिन्न असतील तर आपली संकल्पना पटवून देण्याकरिता माध्यम म्हणून उद्दिष्टित समाजाला भावेल, समजेल अशा चालीरीतींचा, उपयोग केला गेला तर आपले ईप्सित अधिक प्रभावीपणे साध्य होऊ शकते. अशा प्रकारची कृती ही भाषांतरित नसून रूपांतरित असते.

ह्या संदर्भात बीबीसीने सादर केलेल्या एका कार्यक्रमाचे उदाहरण बोलके आहे.

शेतकऱ्यांनी आपल्या उत्पन्नात वाढ करावी म्हणून त्यांना उत्तेजन देण्याकरिता रेडिओवर एक गोष्ट सांगितली गेली. त्या गोष्टीतला तरुण नायक काही डुकरे पाळतो. डुकरांच्या पैदाशीतून खूप पैसे मिळविता येतील आणि आपण धनवान झालो की गावातल्या एकमेव सुंदरीशी आपले लग्न होईल असे तो मनाशी ठरवतो. नुसते ठरवत नाही, तर त्याप्रमाणे डुकरांची पैदास करू लागतो, त्यात जमही बसवतो. पुढे त्याचे लग्न होते, मग घटस्फोट होतो, मग पुनर्विवाह... अशा घटना घडत राहतात परंतु डुकरांची पैदास जोरात चालूच असते. इंग्लंडमध्ये अशा घडामोडी घडत असल्याने शेतकरीवर्गाला ती गोष्ट भावली आणि जो परिणाम अपेक्षित होता तो साधला गेला - डुकरांची पैदास वाढून शेतकरीवर्ग सधन झाला.

हीच गोष्ट इतर देशांत जशीच्या तशी सांगून चालणार नव्हते. अफगाणिस्तानमध्ये ही गोष्ट वेगळ्या प्रकारे सादर केली गेली. तिथला नायक मेंढ्या पाळतो. मेंढ्यांपासून मिळणाऱ्या लोकरीतून खूप पैसे मिळवायचे व ते पैसे मुलीच्या बापाकडून मुलगी मिळवायची, पैसे मिळवायचे, तिच्याशी संसार करायचा असे तो ठरवतो. त्याप्रमाणे मेषपालनाचा उद्योग सुरू करतो, परंतु जवळच्या एका खाणीत स्फोट होतो व त्याच्या सर्व मेंढ्या नष्ट होतात. वैफल्याने ग्रासलेला तो तरुण व्यसनाधीन होतो, परंतु काही काळाने सगळे पुन्हा स्थिरस्थावर होते. तो पुन्हा मेषपालनाला सुरुवात करतो आणि नव्याने जम बसवतो. त्याच्याकडून प्रेरणा इतर लोकही मेंढीपालनाचा उद्योग सुरू करतात. पुढे तो एक फायदेशीर उद्योग म्हणून ओळखला गेला. व्यवसायासाठी एक नवीन क्षेत्र उदयाला आले.

एकच संकल्पना, परंतु भिन्न ठिकाणच्या संस्कृती, चालीरीतींना अनुरूप बदल करून मांडल्यामुळे त्या त्या ठिकाणी अपेक्षित परिणाम साधून गेली. ह्या संदर्भात मला स्वत:ला एक अनुभव आला तो सांगतो. मोबाईल उपकरणांमध्ये अनेक सुविधा उपलब्ध करून दिलेल्या असतात त्यांत विविध प्रकारच्या खेळांचाही समावेश असतो हे सर्वश्रुत आहे. हे खेळ कसे खेळायचे, खेळांचे नियम काय आहेत, गुणांकन कसे होते वगैरे जी माहिती इंग्रजीत उपलब्ध असते ती मराठीत भाषांतर करून देण्याचे काम माझ्यावर सोपवले गेले होते. ह्या खेळांपैकी एक खेळ 'आइस हॉकी' हा होता. हा खेळ मला सर्वस्वी अपरिचित होता आणि त्याच्या विषयीच्या मजकुराचे भाषांतर करणे हे मला कठीण जात होते. पण केवळ त्याच कारणामुळे नव्हे, तर आपण भाषांतरित केलेला मजकूर वाचणारा व त्याचा उपयोग करून आपल्या मोबाईलवरचा खेळ खेळणारा तो 'गडी' कोण असू शकेल अशी मला शंका आली. हे भाषांतराचे काम आले होते उत्तर युरोपातून. मी त्यांना म्हणालो, ''तुमच्या येथे 'स्कीइंग', 'आइस हॉकी' वगैरे खेळ लोकप्रिय असले तरी ज्या सामान्य स्तरावरील मराठी माणसाला ग्राहक म्हणून समोर ठेवून तुम्ही मराठीतून

सूचना असलेला मोबाईल देऊ करीत आहा, तो ते उत्पादन नाकारण्याचीच शक्यता जास्त आहे. त्याला बर्फ ही वस्तू सर्वसामान्यत: बर्फाचे रंगीत गोळे, आइसफ्रुट विकणाऱ्या हातगाडीवाल्यापाशी किंवा आइस्क्रीमच्या दुकानातच दिसतात. अशा परिस्थितीत त्याला बर्फाशी संबंधित खेळ कसा आनंद देऊ शकतील? त्याऐवजी कबड्डी, क्रिकेट ह्यांसारखे खेळ असलेले मोबाईल पुढे ठेवायचा विचार करावा.'' माझ्या सूचनेचे कौतुक करून त्या कंपनीचे अधिकारी म्हणाले, ''आम्हाला केवळ भाषांतरकार नको होता, सल्लागारही हवा होता. तो आज तुमच्या रूपानं मिळाला ह्याचा आनंद होतोय!'' माझ्या हातातून आइस हॉकी निसटले, परंतु काही काळानंतर क्रिकेट आले!

थोडक्यात म्हणजे व्यावहारिक भाषांतरातून आपण जितका आनंद व समाधान प्राप्त करू शकतो तितकाच, किंबहुना परिणामकारकता साधण्याच्या दृष्टिकोणातून अधिक आनंद व्यावहारिक रूपांतरातून मिळू शकतो. ■


**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

१) **प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

२) **प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक :** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** आनंद काटीकर, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद. एफ 301, रिव्हर व्ह्यू रेसिडेन्सी, 12/1/1 वडगाव बुद्रुक, सनसिटी रस्ता, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

४) **मुद्रणस्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

५) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र० 5, पुणे 411 002.

मी, आनंद काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**आनंद काटीकर** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद (प्रकाशक)







अनुक्रमणिका

# भाषा हेच जीवन : द०पं० जोशी

विद्या देवधर

हैदराबाद हे एकेकाळचे संस्थानी राज्य होते. तेथील व्यक्तींनी गेल्या शंभर वर्षांच्या कारकिर्दीत अनेक चळवळींमध्ये हिरीरीने सहभाग घेतला. वेळप्रसंगी त्यांचे नेतृत्वही केले. भाषावार प्रांतरचनेनंतर मराठवाडा साहित्य परिषदेचे कार्यालय औरंगाबादला गेल्यावर १९५८मध्ये हैदराबाद येथे मराठी साहित्य परिषद, (आंध्र प्रदेश) या संस्थेची स्थापना झाली. विसाव्या शतकात मराठीची ध्वजा फडकत ठेवण्याचे काम तेथील प्रा० चिं० नी० जोशी, डॉ० ना०गो० नांदापूरकर, प्रा० र०म० भुसारी, भालचंद्र महाराज कहाळेकर, न्या० गोपाळराव एकबोटे, डॉ० श्रीधरराव कुलकर्णी आणि प्रा० द०पं० जोशी या मंडळींनी आयुष्यभर केले. केवळ मराठीप्रेम व ज्ञानजिज्ञासा या गुणांच्या जोरावर त्यांनी कार्य चालू ठेवले. हैदराबादमधील वाङ्मयीन चळवळींतील शेवटचा खंदा सेनानी आता काळाच्या पडद्याआड गेला आहे.

प्रा० द०पं० जोशी गेली चौसष्ट वर्षे हैदराबादमधील वाङ्मयीन चळवळींशी निगडित होते. मराठवाड्यातील परभणी येथे शालेय शिक्षण पूर्ण करून, ते उच्च शिक्षणासाठी हैदराबादला आले. इतिहासाचे प्रेम, पूर्वसूरींबद्दल आदर, कामाची आवड, अभ्यासू वृत्ती आणि कुशाग्र बुद्धी, असे या आदर्श कार्यकर्त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे रसायन होते.

मराठी साहित्य परिषदेतर्फे १९५८मध्ये मराठी महाविद्यालय सुरू झाले तेव्हा, जोशीसरांचा विवाह होऊन चार-सहा महिनेच झाले होते. त्या वेळी जोशीसर विवेकवर्धिनी महाविद्यालयात आणि त्यांच्या पत्नी डॉ० उषाताई उस्मानिया विद्यापीठाच्या महिला महाविद्यालयात अध्यापक होते. उषाताई सायंकाळी मराठी महाविद्यालयात विनामूल्य अध्यापन करीत, तर जोशीसर व्यवस्थापनाची जबाबदारी पाहात. मराठी महाविद्यालयाला विद्यापीठाची संलग्नता मिळवण्यापासून, प्राध्यापकांना यु०जी०सी० ग्रेडप्रमाणे वेतन मिळवून देण्यापर्यंत महाविद्यालयाची सर्व कार्यालयीन व्यवस्था जोशीसरांनी पाहिली.

भाषा हेच त्यांचे जीवन होते. तोच त्यांचा ध्यास होता. मराठी साहित्य परिषदेचे तीस वर्षे कार्यवाह, आणि 'पंचधारा'चे प्रमुख संपादक म्हणून जोशीसरांनी काम पाहिले. गेली आठ वर्षे ते परिषदेच्या अध्यक्षपदी होते. तेव्हापासून परिषदेची कार्यवाह म्हणून त्यांच्याबरोबर काम करण्याची संधी मला मिळाली.

मराठी टिकवायची, वाढवायची असेल तर फक्त स्वत:च्या संशोधन-प्रकल्पांची

आणि प्रकाशित पुस्तकांची संख्या वाढवून काम होणार नाही. त्यासाठी लोकांची आकलनशक्ती वाढवून घेतली पाहिजे. विचारांच्या आदान-प्रदानाची ओढ लोकांना वाटली पाहिजे, असे सर सांगत असत. भाषिक आणि वाङ्मयीन कार्य सामाजिक संघटनेतून उभे करण्यासाठी जोशीसर स्वत:ही सदैव झटत होते.

### व्याख्यानमाला - चर्चासत्रे

विविध व्याख्यानमाला, चर्चासत्रे यांसाठी विषयाची व योग्य व्यक्तींची निवड आणि कार्यक्रमाचे आयोजन यासाठी आजही सर्वजण जोशीसरांना नावाजतात. ज्ञानेश्वरी लेखनाला सातशे वर्षे झाली तेव्हा जोशीसरांनी 'ज्ञानेश्वरी'च्या प्रत्येक अध्यायावर एक भाषण, अशी १८ दिवसांची व्याख्यानमाला आयोजित केली. माझ्यासारख्या पस्तिशीतील भाषाप्रेमींनाही अभ्यासाला लावले. हैदराबादेतील ३००, ४०० श्रोते सतत अठरा दिवस व्याख्यानांना येत होते आणि समाधान व्यक्त करीत होते. ज्ञानेश्वरांच्या संजीवन समाधीचा सप्तशताब्दी सोहळाही बारा दिवस व्याख्यानमाला घेऊन साजरा केला. ज्ञानेश्वरांचे ग्रंथ, तत्त्वज्ञान, यादवकालीन भाषा, समाज या वेगवेगळ्या विषयांचा अभ्यास आमच्याकडून करून घेतला. ज्ञानेश्वरीच्या निमित्ताने मध्ययुगीन साहित्य आणि विविध कलांचा अनुबंध शोधण्याचा प्रयत्न त्यांनी केला. साहित्य आणि संगीत, चित्रकला स्थापत्य, शिल्प व मूर्तिशास्त्र, नृत्य, नाट्य या कलाविषयांमधील सर्व मराठी तज्ज्ञांना पाचारण केले आणि एका संपन्न सांस्कृतिक वारशाची आम्हांला ओळख करून दिली.

कथाकार दिवाकर कृष्ण जन्मशताब्दी वर्षात त्यांनी मराठी कथाप्रवाहाला वळण देणाऱ्या बारा कथाकारांवर दरमहा शोध-निबंध लिहून वाचून घेतले, नांदापूरकर जन्मशताब्दी वर्षात स्थानिक वक्त्यांचे दरमहा भाषण ठेवून चर्चासत्रही घेतले.

### बहुभाषिक प्रकल्प

आपण हैदराबादमध्ये राहातो म्हणून बहुभाषिक अभ्यासकांना आपण जवळ केले पाहिजे, हे आम्ही सरांकडून शिकलो. भिन्न भाषिक व्यवहार आणि वाङ्मयीन विचाराच्या दृष्टीने हैदराबाद हे एक आदर्श शहर म्हणावे लागेल. दक्षिणेतील भाषांचे अस्तित्व, तेलुगुचे प्रभुत्व, उर्दूचे ठसठशीत स्थान आणि हिंदीचे वाढते महत्त्व यामुळे इथे वाङ्मयीन व वैचारिक आदान-प्रदान शक्यही होते. जाणत्या माणसाच्या वाङ्मयीन कर्तबगारीला भरपूर संधी व सामग्री देणाऱ्या या वातावरणाचा जोशीसरांनी योग्य उपयोग करून घेतला. त्यांनी आयोजित केलेले अनुवादित कादंबऱ्यांवरील चर्चासत्र म्हणजे भारतीय साहित्य जगताची अनोखी सफर होती. मराठीत अनुवादित झालेल्या शेकडो कादंबऱ्या त्यांनी दोन वर्षांत वाचून काढल्या. अनुवादविषयक मराठीतील सद्य:स्थिती व भारतातील सद्य:स्थिती तपासून



अनुक्रमणिका

घेतली, आणि अनुवादित कादंबऱ्यांची साक्षेपी निवड केली. नवे-जुने अभ्यासक हेरून त्यांना कसून कामाला लावले. अभ्यासक निवडताना वय, हुद्दा या दुय्यम गोष्टींचा सर कधीच विचार करीत नसत. 'प्रत्येक नाणं वाजवूनच आम्ही ते जवळ करतो!' असे ते नेहमी म्हणत.

वि०स० खांडेकर जन्मशताब्दीनिमित्त त्यांनी हैदराबादमधील बहुभाषक अभ्यासकांना सामावून घेतले. वि०स० खांडेकर हे आजही तमिळमधील अतिशय लोकप्रिय लेखक आहेत. या चर्चासत्रात तेलुगु, गुजराती, तमिळ, हिंदी अभ्यासकांनी आपल्या भाषेतील खांडेकराचे स्थान लक्षात आणून दिले. तेव्हा खांडेकरांच्या ज्ञानपीठ पुरस्काराचे मोठेपण अधिकच जाणवले.

या चर्चासत्रातील शोधनिबंध 'पंचधारा'मधून वाचकांपर्यंत गेले आहेत. प्रगतिशील उर्दू साहित्य-विशेषांकांची एक मालिकाच 'पंचधारा'ने काढली आणि अली सरदार जाफरी, फैज व कैफी आझमी, मखदूम, यांच्यावरील विशेषांक प्रकाशित केले. गालिबची पत्रे अनुवादित करून लोकांसमोर आणली. हैदराबाद मुक्तिसंग्राम विशेषांकांसाठी सरदार पटेलांची हैदराबादविषयक निवडक ५१ पत्रे अनुवादित केली. एकीकडे अन्य भाषांसह आपले जीवन समृद्ध करून घेत असताना, आपली भाषा टिकवणे, जोपासणे आणि तिचे संवर्धन करणे, हे एक आव्हानच ठरते. भोवतालच्या सर्व भाषांवर प्रभुत्व मिळवून जोशीसरांनी मराठीला अधिक समृद्ध केले. टी०पी० कैलास, सी० नारायण, रेड्डी, राजा राव, श्रीश्री अशा अनेक तमिळ तेलुगु विचारवंतांची ओळख सरांनी 'पंचधारा'तून करून दिली.

### *अनुवाद*

जोशीसरांनी 'अनुवाद' या विषयाकडेही वृत्तिगांभीर्याने पाहिले होते. गेली चाळीस वर्षे साहित्याच्या आस्वादाला नवीन आयाम देण्याचे प्रयत्न त्यांनी केले आहेत. त्यांच्या 'पाषाणत्रय' या पुस्तकात नरेंद्र कोहलींच्या 'अहिल्योद्धार' आणि जिलानी बानु यांच्या दोन लघुकादंबऱ्यांचे अनुवाद समाविष्ट आहेत.

आपल्या भोवतालच्याच समस्यांना वेगळ्या पद्धतीने सामोऱ्या जाणाऱ्या अन्य भाषिक कलाकृती जाणीवपूर्वक मराठीत आणाव्यात असा जोशीसरांचा आग्रह होता. भारतीय स्वातंत्र्य व फाळणीसंबंधी पंजाबमधील लेखन त्यांनी आवर्जून मागवून प्रसिद्ध केले होते. तेलुगु विशेषांक, दक्षिण भारतातील लेखिका विशेषांक, हिंदी विशेषांक, याबरोबर मुन्शी प्रेमचंद मुक्तिबोध, गालिब यांचेवरील पंचधारा विशेषांक त्यांनी काढले. मुस्लीम लेखकांचे तेलुगु भाषेतील कथालेखन त्यांनी आवर्जून 'पंचधारा'मधून दिले.

सुबुद्ध मराठी माणूस 'पंचधारा'चे वाचक आहेत, याचा त्यांना अभिमान होता.



अनुक्रमणिका

आपल्या मराठी वाचकांची जाणीव भारतीय संदर्भात चार पाऊले पुढेच असावी, अशी सरांची तळमळ होती. अनुवादाच्या क्षेत्रातील हा एक विचारवंत होता. 'पाषाणत्रय'च्या प्रस्तावनेत ते म्हणतात, 'वास्तवतेचा आविष्कार वा तत्सम समस्या असूनही त्याची हाताळणी अन्य भारतीय भाषेत वेगळ्या रूपात झालेली आढळली तर तिच्या अवलोकनाने मराठी वाचकांच्या विचार करण्यात काही वेगळ्या जाणिवेची भर पडेल. अशा कादंबऱ्यांचा अभ्यास झाला, चर्चा झाली तर त्यातून चांगल्या-वाईट संबंधीचे आमचे निकष अधिक निर्दोष व्हावेत, ही अपेक्षा असतेच. हे काम चांगल्या वेधक कलाकृतींच्या मराठी अनुवादाने साध्य होऊ शकेल.'

मराठीतील समीक्षा-व्यवहाराचा सखोल अभ्यास त्यांनी केला होता. भाषेपुढील कालसापेक्ष आव्हाने त्यांनी समजून घेतली होती. या आव्हानांना कसे तोंड द्यावयाचे याचा विचारही त्यांनी त्यासाठी केला होता. १९९२-९३मध्ये त्यांनी 'उत्तर आधुनिकतावाद' या संकल्पनेची कसून तपासणी केली. दक्षिण भारतीय भाषांमधील साहित्यातील विविध प्रवाहांचा शोध घेतला. 'भारतीय भाषांतील स्त्री-साहित्याचा मागोवा' (खंड २, २००७)ची त्यांची विवेचक प्रस्तावना वाचताना त्यांच्या समीक्षादृष्टीची कल्पना येते.

**साहित्य - प्रकल्प**

'पंचधारा'च्या नित्य नवीन अंकाच्या परिपूर्णतेचा ध्यास घेताना सरांनी तीन मोठे साहित्य प्रकल्पही पूर्ण केले. 'मराठवाड्याचा वाङ्मयीन व सांस्कृतिक इतिहास' हा सामान्यत्वे उपेक्षित विषय आहे. या विषयावर जे थोडेफार लिहिले गेले ते परिपूर्ण तर नाहीच, उलट विपर्यस्तही आहे. हे लक्षात घेऊन परिषदेतर्फे जोशीसरांनी एक प्रकल्प हाती घेतला.

लक्ष्मणराव फाटक यांच्या 'निजाम विजय' या साप्ताहिकामधून १९२०-४० या काळातील मराठवाड्यातील राजकीय सामाजिक आंदोलने, भाषिक घडामोडी, मराठी समाजाची मनोभूमिका यांचे दर्शन घडत होते. जोशीसरांनी 'निजाम विजय'मधील लेख संकलित केले. त्यातून 'काळाच्या पडद्याआड' हा त्रिखंडात्मक संपादित ग्रंथ सिद्ध झाला. डॉ० उषाताई जोशी व द०पं० जोशी हे 'ना०गो० नांदापूरकर समग्र साहित्य' या द्विखंडात्मक ग्रंथाचेही प्रमुख संपादक होते. त्यांच्याबरोबर सहसंपादक म्हणून काम करण्याची संधी मला व श्रीकांत उमरीकर यांना मिळाली.

हैदराबाद सेंट्रल युनिव्हर्सिटीच्या उर्दू विभागाने सेतुमाधवराव पगडी यांच्यावरील चर्चासत्रासाठी जोशीसरांना बोलावले. त्यानिमित्त पगडी यांच्या साहित्याचे पुनर्वाचन करताना त्यांचे प्रत्येक पुस्तक महत्त्वाचे आहे; पण दुर्मीळ आहे हे सरांना जाणवले.

उद्याच्या अभ्यासकांसाठी, उर्दूच्या व इतिहासाच्या प्रेमींसाठी हे अक्षरधन सहज उपलब्ध व्हायला हवे, असे सर वारंवार म्हणू लागले, तेव्हा आता सर नवीन कामाच्या प्रेमात पडले आहेत, हे माझ्या लक्षात आले. पगडींची ५० मराठी व १५ इंग्रजी पुस्तके एकत्र करावयाची, त्यांची विषयवार वर्गवारी करायची, शिवाय दहा हजार पृष्ठांच्या पुनर्मुद्रणासाठी लाखो रुपये उभे करायचे, असे अनेक संकल्प ते बोलू लागले आणि पुस्तकेही जमवू लागले. या कामासाठी खर्चाची एक-तृतीयांश रक्कम सरकारकडून मिळाली. ऑगस्ट २००९मध्ये आम्ही छपाईचे काम सुरू केले. वर्षभर आम्हांला या कामाचा ध्यास लागला होता.

इंग्रजी पुस्तकांचे संपादन डॉ० गो०बं० देगलूरकर यांनी केले, सहा मराठी खंडांचे प्रमुख संपादक, द०पं० जोशी व उषाताई, आणि सहसंपादक म्हणून मी व धनंजय कुलकर्णी होतो. दिवसाचे कामाचे वेळापत्रक ठरवून सर व उषाताई मान मोडून कामाला लागल्या. सुमारे बारा हजार पृष्ठांचे हे काम, करताना या दोघांनी त्यातील शब्दन् शब्द तपासला आहे. डॉ० उषाताईंचे शुद्धलेखन, मुद्रितशोधन म्हणजे साहित्य-व्यवहारात अंतिम शब्द मानला जातो. 'पंचधारा'चा प्रत्येक अंक लेखनदृष्ट्या बिनचूक असतो असा लौकिक त्यांनी मिळवून दिला आहे. बरोबर एक वर्षाने सेतुमाधवराव पगडी यांच्या जन्मशताब्दिदिनी, २६ ऑगस्ट २०१० रोजी तत्कालीन मुख्यमंत्री अशोक चव्हाण यांनी ग्रंथाचे प्रकाशन केले आणि दहा लाख रुपयांचे अनुदान घोषित केले. मात्र ते अनुदान अद्याप हाती आले नाही.

जोशीसरांनी 'पंचधारा' (त्रैमासिक) सातत्याने दर्जा राखून प्रकाशित केले. 'पंचधारा'ची दखल राष्ट्रपती पुरस्कार, महाराष्ट्र फाउंडेशन पुरस्कार देऊन घेतली गेली, याचे समाधान वाटते. भाषेवर प्रेम करणारे ते महान योगीच होते. अनेक योजना डोळ्यांसमोर दिसत असल्यामुळे अलीकडे त्यांना कामाची फार घाई होत असे. कधी ते चिडतही असत; पण त्यांनी आपल्या सहकाऱ्यांचे सामर्थ्य आणि मर्यादा ओळखल्या होत्या. त्यांच्या मनातील वात्सल्यभाव आम्ही अनुभवला आहे. अनेक भाषा शिकता शिकता, बोलता बोलता जोशीसर विविध भाषिक संस्कृतीतील चांगल्या गोष्टी आत्मसात करीत गेले. त्यांना आपल्या भाषेविषयी प्रेम होतेच; पण दुसऱ्याबद्दल त्यांनी मनात आकस धरला नाही. एकप्रकारे बहुभाषिक संस्कृतीचे सत्त्व त्यांनी जोपासले. सरांचे ऋण आणि वारसा फार मोठा आहे. परिषदेचे आम्ही सर्व कार्यकर्ते असे मानतो की आपले सामर्थ्य अपुरे आहे. तेव्हा त्यांच्या ऋणात राहूनच, आपण पुढील वाटचाल करीत राहू. ■

## प्रा० द०पं० जोशी : अल्प परिचय

जन्म : १४ ऑक्टोबर १९३२, मृत्यू : ३० डिसेंबर २०११

शिक्षण : मराठी एम०ए० (१९५९) उस्मानिया विद्यापीठ, परभणी.

व्यवसाय : १९५९ ते १९९२ पर्यंत 'विवेक वर्धिनी' महाविद्यालयात अध्यापन.

संस्थात्मक कार्य : मराठवाडा साहित्य परिषद (१९५०-१९५८) व मराठी साहित्य परिषद, आंध्रप्रदेश (१९५० ते २०११) या संस्थांच्या कार्याशी वेगवेगळ्या नात्याने सहभाग. अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे दोनदा उपाध्यक्ष. जवळाबाजार येथील परभणी जिल्हा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, १९९८.

ग्रंथसंपदा :
( १ ) 'काळाच्या पडद्याआड' (१९९२) तीन खंड (हैदराबादचा १९२० ते १९४० पर्यंतचा सर्वांगीण इतिहास)
( २ ) 'चिं०नी० जोशी व्यक्तिमत्त्व व वाङ्मय', २००० (चरित्रलेखन व स्फुट संशोधनात्मक लेखांचे संपादन)
( ३ ) 'कर्तृत्वाचा महामेरु' (आंध्र पितामह के०व्ही० लक्ष्मणराव यांचा संशोधनात्मक लेखांचे संकलन व संपादन)
( ४ ) 'के०व्ही० लक्ष्मणराव' - चरित्र
( ५ ) 'लक्ष्मणा स्वयंवर' (महानुभाव कवी डिंभ यांच्या काव्याचे संशोधनात्मक संपादन)
( ६ ) 'पाषाणत्रय' (उर्दू व हिंदी कादंबऱ्यांचे अनुवाद)
( ७ ) 'पानगळीची सळसळ' (कुर्तुल-ऐन-हैदर यांच्या उर्दू कथासंग्रहाचा मराठी अनुवाद, साहित्य अकादमी प्रकाशन)
( ८ ) Dr S.V. Ketkar (इंग्रजी चरित्र, साहित्य अकादमी प्रकाशन)
( ९ ) 'डॉ० नांदापूरकर यांचे समग्र साहित्य' (ग्रंथ खंड १चे संपादन)
(१०) 'समग्र सेतुमाधवराव पगडी' (आठ खंडांचे संपादन)
(११) 'हैदराबादची हस्तलिखिते' ( महाराष्ट्र राज्य मराठी विकास संस्थेचे प्रकाशन)
(१२) 'व्यक्तिविशेष'
(१३) 'इतिहास हैदराबादचा'
(१४) 'दक्षिणा-प्रदक्षिणा'
(१५) 'गालिब व सरदार जाफरी यांची पत्रे'



अनुक्रमणिका

# ज्ञानरचनावादी भाषाशिक्षणाचा प्रयोग

रमेश पानसे

भाषा ही मानवी जीवनाचा एक अविभाज्य असा भाग आहे. भाषेशिवाय आपण जगू शकतो, पण तिच्याशिवाय आपण तगू शकत नाही. म्हणजे असे की, भाषेशिवाय माणूस जगू शकतो; पण तो एक सामाजिक, सुसंस्कृत माणूस म्हणून जगू शकत नाही. त्यामुळे, भाषेची जी अनेक कार्ये आहेत, त्यांतील सर्वात पायाभूत असे कार्य आहे ते माणसाला माणसात आणण्याचे कार्य. ज्यांना जन्मापासून कुठलीही भाषाच अवगत नाही, अशी माणसे (स्वमग्नतेचा म्हणजे समाजदूरतेचा (autism) आजार असलेले रुग्ण इ०), माणूस म्हणून जीवनाचा सर्वार्थाने आनंद घेऊ शकत नाहीत.

भाषा येणे आणि भाषा समृद्ध होणे या दोन भिन्न गोष्टी आहेत. आधुनिक माणसाच्या बाबतीत (गेली सुमारे तीस हजार वर्षे) भाषा येणे ही एक नैसर्गिक क्षमता आहे. अट एकच आहे; ती म्हणजे जन्मापासून समाजात वावर असणे. भाषा प्रत्येकालाच अवगत होत असते; पण ती समाजाकडून नवजात बालकाकडे संक्रमित होत असते. अशाप्रकारे, प्रत्येकालाच भाषा येते. परंतु भाषा चांगली येणे, विविध वळणांनी येणे, प्रमाणभाषा येणे, भाषा गरजेनुसार वाकवता येणे, प्रतीक-भाषा आकळणे, भाषेकरवी अमूर्त विश्वात विहरता येणे या साऱ्या गोष्टी, जेवढ्या अनुभवाच्या तेवढ्याच त्या 'शिकण्या'च्या गोष्टी आहेत. थोडक्यात असे की, भाषा समृद्ध होण्यासाठी, समृद्ध भाषा येण्यासाठी शिक्षणाची जोड येणे आवश्यक आहे.

शिक्षणाचेच एक पायाभूत उद्दिष्ट आहे ते म्हणजे विद्यार्थ्यांना समृद्ध भाषा प्राप्त करून देणे. मुले भोवतालच्या व्यावहारिक भाषेत वावरतच असतात. त्यामुळे ती भाषा त्यांना 'शिकविण्या'ची गरज नसते. परंतु, मुलांना जरा वरच्या सांस्कृतिक पातळीवर जाण्यासाठी, लेखन-वाचनासाठी लागणारी प्रमाणभाषा शिकणे आवश्यक असते. अर्थात सुरुवात इथून झाली तरी, समृद्ध भाषेकडे नेणारा प्रवासही घडावा लागतो. म्हणजे भाषा शिक्षणाच्या प्रवासाचे दोन टप्पे सांगता येतात. व्यावहारिक बोलीकडून प्रमाणित भाषेकडे जाणे हा एक टप्पा आणि त्यानंतर प्रमाणभाषेकरवी समृद्ध भाषेकडे जाणे हा दुसरा टप्पा. शालेय भाषाशिक्षणात हे दोन्ही टप्पे आवर्जून घ्यायचे असतात. आपले भाषिक-सामाजिक दुर्दैव असे आहे की दहा वर्षे शालेय शिक्षण घेऊनही बहुसंख्य मुलांच्या बाबतींत त्यांचा पहिल्या टप्प्याच्या प्रवासही पूर्ण होत नाही. नेमका येथे भाषाशिक्षणाचा नव्याने

विचार होणे गरजेचे आहे.

आपल्याकडे, मुळातच भाषाशिक्षणाचा जाणतेपणाने विचार करणारे लोक फार थोडे आहेत. माधुरी पुरंदरे ह्या या थोड्या लोकांपैकी एक आहेत. भाषाशिक्षणाच्या दोन्ही टप्प्यांचा त्यांनी सांगोपांग विचार केला आहे. मुलांचे भाषाशिक्षण हा त्यांनी आपल्या अभ्यासाचाच नव्हे; तर आपल्या ध्यासाचा विषय केला आहे. त्यांचे कार्य हे नुसते वैचारिक स्तरावरचे नाही तर त्यांनी आपला प्रत्येक विचार लेखनरूपात परावर्तित करून प्रत्यक्ष भाषाशिक्षणाच्या व्यवहारांत वावरणाऱ्या शिक्षकांची विलक्षण मोठी सोय करून ठेवली आहे. मी जे भाषाशिक्षणाच्या प्रवासाचे दोन टप्पे सांगितले, त्यातील पहिल्या टप्प्याचा प्रवास मांडणारी त्यांची अनेक पुस्तके आहेत, उदाहरणार्थ, 'राधाचं घर' ही घरांतील व्यक्तिसंबंध सांगणारी छोटेखानी पुस्तक-मालिका किंवा चित्रवाचन मालिका, ही पुस्तके आपण पाहावीत. तर 'वाचू आनंदे' आणि त्याचबरोबर 'लिहावे नेटके' हे ग्रंथ विद्यार्थ्यांना आणि त्यांच्या शिक्षकांना समृद्ध भाषेकडे घेऊन जातील असे ग्रंथ आहेत. या ग्रंथांची काही वैशिष्ट्ये लक्षात येण्यासाठी, मुळात भाषाशिक्षणाचे स्वरूपच आपल्याला लक्षात घ्यायला हवे आहे. मुलांचे भाषाशिक्षण दोन प्रकारे होत असते. पहिल्याला 'अनौपचारिक भाषाशिक्षण' असे नाव देता येईल व त्याचे वर्णन 'सहज होणारा भाषासंस्कार' असे आपल्याला करता येईल. तर दुसऱ्या प्रकाराला 'औपचारिक भाषाशिक्षण' असे म्हणता येईल. दोन्हींमध्ये फरक आहे तो असा की, पहिल्या प्रकारात होणारे भाषाशिक्षण हे कुटुंबात व त्याबाहेरच्या परिसरात अनुभवांच्या साहाय्याने आपोआप होणारे असे असते. तर, दुसऱ्या प्रकारात ते लेखन-वाचन या कौशल्यांच्या साहाय्याने, जाणीवपूर्वक घडवावे लागते.

**अनौपचारिक भाषाशिक्षण**

अनौपचारिक शिक्षणाचा एक धागा, मुले ज्या सांस्कृतिक-सामाजिक वातावरणाचा भाग असतात, तेथील अनुभवविश्वाशी जोडलेला असतो तर त्याचा दुसरा धागा, प्रत्यक्षपणे प्राप्त होणाऱ्या निवडक अशा भाषिक अनुभवांशी जोडलेला असतो. मुलांचे हे अनुभवविश्व जेवढे समृद्ध तेवढ्या अनौपचारिक भाषाशिक्षणाच्या संधी संख्येने मोठ्या, स्वरूपाने विविधांगी नि दर्जाने उच्च प्रतीच्या असतात. अशा वातावरणातील मुलांचा भाषाविकास वेगाने समृद्धतेकडे जातो. सामाजिक-सांस्कृतिकदृष्ट्या (केवळ आर्थिकदृष्ट्या नव्हे!) वरच्या वर्गातील मुलांना, आपल्या पालकांकडून आणि घरातील प्रौढांकडून अधिक प्रमाणात शब्दोच्चार ऐकायला मिळतात. (एका अभ्यासातील संशोधित निष्कर्षांनुसार दर तासास ४८७) तर, सामाजिक-सांस्कृतिकदृष्ट्या (आणि आर्थिकही!) मागास वर्गातील मुलांना तुलनेने खूपच कमी (१७८) शब्दोच्चार ऐकायला मिळतात. आणि भाषा ऐकायला मिळणे हेच तर भाषाशिक्षणाचे प्रमुख साधन असते!

भाषा ऐकणे हे भाषा शिकण्याचे प्रमुख साधन असते, या माझ्या विधानाचे थोडेसे सैद्धांतिक, थोडेसे शारीरवैज्ञानिक (Biological) स्पष्टीकरण देता येईल. मुले आपल्या लहान वयात, कुणीही न शिकविता, आपली आपणच आणि तीही अतिशय वेगाने, परिसरातील भाषा आत्मसात करतात. भाषा नैसर्गिकरीत्या 'आत्मसात होणे' (to acquire, acquisition) आणि भाषा 'शिकणे' (to learn, learning) या मेंदूपातळीवरील दोन भिन्न प्रक्रिया आहेत. मेंदूमधील त्यांची स्थानेही वेगवेगळी आहेत.

भाषा आत्मसात करण्याच्या मुलांच्या प्रक्रियेत तीन घटनांचा समोवश होतो. एक, कर्णेंद्रियांनी भाषा (शब्द, वाक्ये इ०) ऐकणे. दोन, ऐकलेल्या भाषेच्या अर्थाचे आकलन होणे आणि तीन, अर्थग्रहण झालेली भाषा शब्दोचारांच्या साहाय्याने बोलता येणे. थोडक्यात असे की, भाषा ऐकता येणे, ऐकलेले कळणे आणि कळलेले बोलता येणे याला, भाषा आत्मसात होणे असे आपण म्हणू शकतो. मानवी मेंदूमध्ये, ऐकलेली भाषा कळणे आणि कळलेली भाषा बोलणे यांची दोन स्वतंत्र केंद्रे असतात. पहिल्या केंद्राला 'वर्निक केंद्र' असे नाव आहे. हे डाव्या मेंदूत टेंपोरल लोबमध्ये कानाच्या नजीक वरच्या बाजूस असते. तर दुसरे, बोलण्याचे केंद्र 'ब्रोका केंद्र' म्हणून ओळखले जाते व ते फ्रंटल लोबमध्ये साधारणपणे डाव्या डोळ्याच्या वरच्या बाजूस वसलेले असते. भाषा आत्मसात होण्याच्या बालकाच्या प्रवासात वर्निक केंद्र हे आधी विकसित होत जाते (अगदी जन्मापासूनच) तर ब्रोका केंद्र हे नंतर विकसित होत जाते (आठव्या, नवव्या महिन्यांपासून). त्यामुळे व्यवहारात असे दिसून येते की, मुले, आधी दुसऱ्याने बोललेली भाषा समजू लागतात, व नंतर काही महिन्यांनी भाषा बोलू लागतात. म्हणजे भाषा बोलण्यासाठी भाषा कळावी लागते, आणि हे भाषा कळण्याचे काम केवळ भाषा ऐकण्यानेच होत असते. म्हणूनच भाषा आत्मसात होण्यासाठी, त्याच्या सर्वोत्तम वयात म्हणजे वयाच्या सहाव्या वर्षापर्यंत (आणि अर्थातच त्यानंतरही) भाषा भरपूर ऐकायला मिळणे आवश्यक असते.

मुलांना भाषानुभव मोठ्या प्रमाणात मिळणे ही बाब अनौपचारिक भाषाशिक्षणात महत्त्वाची आहे. भाषिक अनुभवांचे प्राथमिक स्वरूप हे भाषा ऐकायला मिळणे आणि भाषा बोलायला मिळणे, शब्दसंग्रह वाढणे आणि शब्दांच्या (व वाक्यांच्या) अर्थाचे आकलन होणे आणि जरा मोठेपणी विचार, कल्पना, भावना यांची अभिव्यक्ती करायला मिळणे या प्रकारचे असते. ज्या घरांतून आणि बालशाळांतून हे अनुभव मोठ्या प्रमाणात मिळतात, तेथील मुलांचा शब्दसंग्रह वाढून भाषाविकास (व बौद्धिक विकास-बुद्ध्यंक वाढ) अधिक होतो, असे आजच्या भाषाविज्ञानाचे प्रतिपादन आहे.

मुलांच्या अनौपचारिक शिक्षणातही, संबंधित प्रौढांचे मुलांशी असणारे वागणे-बोलणे महत्त्वाचे असते. भाषाशिक्षणात तर ते अधिकच महत्त्वाचे असते. शिकण्याच्या वयात



अनुक्रमणिका

नि वेळेस, मुलांना प्रोत्साहित करणारी वाक्ये किती प्रमाणात ऐकायला मिळतात यावर मुलांचा बौद्धिक विकास व भाषाविकास अवलंबून असतो (एका अभ्यासातील संशोधित निष्कर्ष असे सांगतो की सुसंस्कारित घरांत, वयाच्या तिसऱ्या वर्षापर्यंत, ५ लाख प्रोत्साहित करणारी व ८० हजार नाउमेद करणारी विधाने मुले वर्षभरात ऐकतात. तर मागास घरांत याच्या उलट परिस्थिती आढळते. तेथे ७५ हजार प्रोत्साहित करणारी तर २ लाख नाउमेद करणारी वाक्ये मुलांच्या नशिबी असतात!) त्यामुळे घरातील वातावरण भाषाविकासास पोषक असण्याची गरज अधोरेखित होते.

अनौपचारिक भाषाशिक्षणाचा काळ हा प्रामुख्याने शालेयपूर्व वयाचा काळ असतो. आणि यामुळेच यासंदर्भात पालकांची भूमिका महत्त्वाची ठरते. माधुरी पुरंदरे यांनी जी काही छोटी पुस्तके निर्माण केली आहेत त्यांचा वापर पालकांच्या हातून होण्याची गरज आहे.

**भाषेचे औपचारिक शिक्षण**

शालेय शिक्षणात भाषाशिक्षणाला मध्यवर्ती स्थान असते; तसे ते असावे लागते. शालेय स्तरावर (आणि अर्थातच नंतरही) भाषा हेच इतर विषय शिकण्याचे माध्यम असते. शाळा-महाविद्यालयांमध्ये असणारा प्रत्येक अभ्यासविषय हे एक, स्वत:चे स्वतंत्र कार्यक्षेत्र असणारे शास्त्र असते. या सर्व शास्त्राभ्यासांसाठी समृद्ध भाषेची गरज असते. मात्र एवढेच फक्त नाही. शास्त्राभ्यासांसाठी विद्यार्थ्यांना तर्कबुद्धी, कल्पनाशक्ती, शोधवृत्ती आणि वाढता शब्दसंग्रह यांची गरज असते. मुख्य म्हणजे या सर्वांची बेगमी भाषेकरवी होऊ शकते. हे आपण सर्वांनी पटवून घेण्याची आवश्यकता आहे. इथे मी, माधुरी पुरंदरे यांच्या पुरस्कारित 'लिहावे नेटके' या ग्रंथाच्या खास वैशिष्ट्याचा उल्लेख करणार आहे.

हा ग्रंथ, व्याकरणातील एकेका घटकांना घेऊन भाषाशिक्षणात उतरत असला तरी त्यात भाषेच्या उपर्युक्त विविध कार्यांची दखल, जवळजवळ प्रत्येक प्रकरणाच्या मांडणीत घेतली आहे. या ग्रंथातील ही मांडणी हा भाषावृद्धीचा अंगभूत प्रकल्प आहे, असे मी म्हणेन. उदाहरणादाखल एका प्रकरणाचे विश्लेषण करू या.

या द्विखंडी ग्रंथात 'समानार्थी' शब्दांवरचे एक प्रकरण आहे. त्याचे शीर्षकच मोठे गमतीदार आहे. ते असे आहे : 'ह्यासारखे, त्यासम, तसेच, त्यासमान, मिळतेजुळते, पर्यायी... म्हणजे तेच ते... समानार्थी!' म्हणजे विद्यार्थी-वाचक क्षणभर जरी या शीर्षकावर थबकला तरी 'समानार्थी' शब्द कसे असतात ते त्याला कळेल. शिवाय, पुढे... 'समानार्थी' म्हणजेच 'सारख्या अर्थाचे शब्द' अशी निश्चित व्याख्याही एका परिच्छेदाच्या आधारे समजावून दिली आहे. पण ही सारी झाली 'माहिती'. या माहितीचे रूपांतर 'ज्ञाननिर्मितीच्या प्रक्रिये'त व्हायचे असेल तर या माहितीचा वापर मूर्त वा अमूर्त पातळीवर करायची संधी विद्यार्थ्याला मिळावी लागते. हा ग्रंथ, ही संधी विद्यार्थ्यांना



अनुक्रमणिका

कशी देतो हे पाहणे मनोरंजक आहे.

( १ ) विद्यार्थी-वाचकासाठी येथे काही वाक्ये दिली आहेत. प्रत्येक वाक्यात एक शब्द ठळक करून दिला आहे आणि विद्यार्थ्याने त्याच्या जागी त्याचा समानार्थी शब्द भरायचा आहे.

या उपक्रमात विद्यार्थी आपली स्मृती आणि आपले पूर्वज्ञान यांना मानसपातळीवर आवाहन करून, असे शब्द भरील. दिलेली वाक्येच मुळी, विद्यार्थ्यांच्या परिसरज्ञानाला साक्षी ठेवून भिन्न वातावरणाला भिडणारी आहेत. म्हणजे क्रमिक पुस्तकावरील धड्यासारखी एकाच संदर्भातील नाहीत की, जेथे विद्यार्थ्यांची स्मृतीच विशिष्ट धड्याशी जखडली जाते. या ग्रंथातील या प्रकरणात विद्यार्थ्यांच्या स्मृतीला मुक्तपणे फिरण्याचा वाव दिला आहे. विद्यार्थ्याला कुठे कुठे फिरवून आणले आहे! येथे क्रिकेटचा खेळ आला आहे, घरातील कागद हरवणे आहे, महापालिकेचे पाणीपुरवठा खाते आले आहे - रस्ता रुंदी आली आहे. येथे कादंबरी लेखन आले आहे आणि वार्षिक हिशोब तपासणीही आली आहे. निधीमुळे अडलेले पुलाचे काम आले आहे आणि सोन्याच्या दागिन्यांचे कामही आले आहे. कुणाचे कर्तृत्व आले आहे तर कुणाचा धांदरटपणाही आला आहे, प्राण्याचे दर्शनही आहे. विद्यार्थ्यांच्या स्मृतीला अमर्यादित अवकाशात विहार करू देणे हा त्यांना भाषिक समृद्धीकडे नेण्याचाच एक मार्ग आहे; आणि ते इथे घडले आहे, हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य आहे.

( २ ) आता लगेच दुसरा उपक्रम येतो. उपक्रम साधा आहे. छोटे छोटे परिच्छेद दिले आहेत आणि त्या प्रत्येक परिच्छेदात येणारे समानार्थी शब्द मुलाने अधोरेखित करायचे आहेत.

आधीच्या उपक्रमात मुलाने स्मृतींतील शब्दांना, बोलवायचे होते. या उपक्रमात शब्द हजरच आहेत. विद्यार्थ्याला फक्त नातेजोड करायची आहे. समान अर्थाच्या शब्दांची जुळणी करायची आहे. येथे मेंदूला वेगळ्या प्रकारचे खाद्य आहे. परिच्छेद सूक्ष्मतेने वाचावा लागणार आहे, शब्द शोधण्यासाठी परत परत वाक्यांवर नजर फिरवावी लागणार आहे. शब्दांना शब्द लावून ते परस्परांशी अर्थाने जुळतात का ते पाहायचे आहे. मुख्य म्हणजे हा सर्व खटाटोप करताना मन एकाग्र करायचे आहे. या साऱ्याच प्रक्रिया मुलांना ज्ञाननिर्मितीकडे नेणाऱ्या आहेत.

( ३ ) भाषेत खूप गमती असतात. उदाहरणार्थ, भाषेत समानार्थी **असणारे** शब्द असतात तसेच समानार्थी **वाटणारे**, समानार्थी **भासणारे** शब्दही असतात. माधुरीताईंना, आता, समानार्थी असणाऱ्या शब्दांकडून समानार्थी वाटणाऱ्या शब्दांकडे विद्यार्थ्यांना घेऊन जायचे आहे. ही उडी जरा मोठी आहे. त्यामुळे एकाच अर्थाच्या पण वेगळ्या अर्थच्छटा कशा असतात व त्या का असतात हे नीटपणे

आधी उदाहरणांसहित समजावून दिले आहे. भाषेचे वैशिष्ट्य असे असते की अर्थविचाराच्या (Semantics) क्षेत्रात भोंगळपणाला वाव नसतो. दोन समान वाटणाऱ्या शब्दांमधील सूक्ष्म अर्थबदलही (semantic change), भाषा वापरात नेटकेपणा आणण्यासाठी लक्षात घ्यायचा असतो. नेमके हे उद्दिष्ट गाठण्यासाठी येथे वेगवेगळे भाषिक उपक्रम दिले आहेत.

एक उपक्रम असा आहे की एकाच अर्थाच्या अनेक छटा असणाऱ्या शब्दांचे गट दिले आहेत, पुढे वाक्ये दिली आहेत आणि विद्यार्थ्याने त्या वाक्याचा नेमका अर्थ हेरून त्याला साजेसा शब्द, वाक्यातील मोकळ्या जागी भरायचा आहे. ही वाक्ये देताना पुन्हा, वातावरणातील अनुभवांच्या विविधतेची दखल घेतली आहेच. इथे रंग आहेत, पाऊस आहे. तसेच लग्नसमारंभ, जन्मभरचे कष्ट, गैरमार्गाने संपत्ती गोळा करणे, सरकार, चित्रपट, सामाजिक संस्था, वनस्पतिशास्त्र, संगणक, पुस्तके अशा गोष्टी येथे येतात.

( ४ ) माधुरीताईंनी दिलेल्या उपक्रमांची यादी येथे थांबत नाही. कारण, 'समानार्थी' या शब्दाची काही अंगे अजून बाकी आहेत. समानार्थी शब्द असेही असतात, की आपण बोलताना एक शब्द वापरू तर लिहिताना वेगळाच शब्द वापरण्याची गरज असते. त्यातही किती तरी बारकावे असू शकतात! माधुरीताईंनी, या ग्रंथाच्या विद्यार्थी-अभ्यासकाला उद्देशून लिहिले आहे, ''म्हणजे बघ, जेवायला हाक मारताना **परिस्थितीनुसार** आणि **मनःस्थितीनुसार**....''
''आधी जेवण करून घे आणि मग बाहेर जा, बरं का!'' किंवा
''पान वाढलंय. आधी गिळा आणि मग उधळा कुठे उधळायचंय ते!''

परिस्थितीनुसार, मनःस्थितीनुसार बोलण्यात शब्दच्छटा बदलतात. तशाचप्रकारे बोलणे व लिहिणे यांमधील वेगळ्या अर्थच्छटांची उदाहरणेही, माधुरीताईंनी दिली आहेत. पुन्हा त्यातही, जुन्या भाषेतील शब्दवापराची धाटणी आणि साहित्यिक, काव्यात्मक भाषेतील धाटणी यांच्या सूक्ष्मतेतही त्या उतरतात. त्यासाठी त्या प्रत्यक्ष वाङ्मयातील उदाहरणे-उद्धृते घेतात. एक 'संध्याकाळ' व्यक्त करण्यासाठी दिवेलागण, राक्षसवेळ, सांजावणे, तिन्हीसांज, तिसरा प्रहर, सायंकाळ असे कितीतरी प्रतिशब्द येतात. कवितेच्या उदाहरणात तर आपण वाचताक्षणीच त्या विशिष्ट शब्दच्छटेच्या आधारे पूर्ण कवितेतच शिरू पाहतो, अशी साक्षेपी निवड त्यांनी केली आहे. दिनान्ती, संध्यासमयी, संध्या, श्यामलवेळ, सांज, संधिकाली, कातरवेळेची, सांजवेळी, सांध्यवेळी, श्यामसंध्या, सायंकालीन इत्यादी. ही सारी उदाहरणे वाचताना मराठी भाषा किती प्रगल्भ आहे आणि भाषिक आनंद देण्याची केवढी ताकद यांमध्ये आहे याची प्रचीती येते. जशी आपल्याला येईल तशी ती शालेय वयातील विद्यार्थ्यांनाही यावी, हा प्रयत्न येथे आहे.



अनुक्रमणिका

( ५ ) उदाहरणांसाठीच, पण कवितांचा वापर आणखी एके ठिकाणी दुहेरी पद्धतीने केला आहे. एकाच अर्थाच्या अनेक छटा दाखविण्यासाठी जसा आधी उपयोग केला आहे, तसा आता कवितेतील विशिष्ट अर्थवाही नि कवीने योजलेला शब्द जर आपण, अगदी समानार्थीच शब्द वापरून, बदलला तर कवितेचा रसभंग कसा होऊ शकतो, हे समजावण्याच्या पातळीवर शालेय विद्यार्थ्यांना नेण्यासाठीही कवितेतील उदाहरणांचा वापर केला आहे. एकदोनच उदाहरणे येथे उद्धृत करतो.

''येरे ढगा, येरे ढगा, न्हाऊ घाल माझ्या मना।'' किंवा

''तोच चंद्रमा आकाशात, तीच चैत्र यामिनी।''

येथे झालेली शब्दांची घुसखोरी मुलांना ओळखायला सांगितली आहे. शब्दच्छटांच्या वापराचा, आणि त्याचबरोबर कवितेकडे पाहण्याचा एक नवा दृष्टिकोनच, माधुरीताई, जाता जाता विद्यार्थ्यांना देतात.

( ६ ) आता, सोप्याकडून कठिणाकडे जावे, हे एक प्राथमिक शैक्षणिक तत्त्व अवलंबून माधुरीताई काही कठीण उपक्रम विद्यार्थ्यांपुढे ठेवतात.

या उपक्रमात, शंभर चौकटींचा एक मोठा चौरस असून त्यात अक्षरे भरलेली आहेत. हे एक शब्दकोडे आहे. यात एकूण सहा शब्दांचे समानार्थी शब्द दिले आहेत. असे एकूण एक्केचाळीस शब्द मुलांना शोधायचे आहेत. हे शब्दकोडे तसे खूप कठीण आहे. पण आधीचे एक एक उपक्रम करीत गेले तर विद्यार्थी प्रयत्न करण्याचे आव्हान घेण्यास तयार होईल. शिक्षणात नवे आव्हान घ्यायला मिळणे ही मोठी आनंदमय प्रक्रिया असते. विद्यार्थ्यांना शोध घ्यायला मिळाले की ते स्वतःच आपल्यासमोर आव्हान उपस्थित करतात आणि आनंदाने उत्तरे शोधण्यासाठी झगडतात. मुलांना उत्तरे 'द्यायला' सांगू नये, (उत्तरे सांगू तर नयेतच!) तर उत्तरे 'शोधायला' सांगावीत असे शिक्षणाचे आधुनिक, रचनावादी तत्त्वज्ञान सांगते.

'शोध घेते ते शिक्षण' अशीच तर शिक्षणाची व्याख्या मी करतो. दुसऱ्याने काही 'शिकविण्या'पेक्षा विद्यार्थ्यास स्वतःहून शोध घ्यायला लावणे, हा शिक्षणात परिवर्तन घडवून आणणारा सर्वात मोठा शोध आहे. मुलांना शोध घ्यायला लावल्याने त्यांच्या मनांमध्ये, तीन तऱ्हेच्या शैक्षणिक प्रक्रिया एकाच वेळेस घडून येतात. एक म्हणजे, विद्यार्थी विचार करायला प्रवृत्त होतात. (विचारशक्तीचा विकास हे शिक्षणाचे एक प्रधान उद्दिष्ट असते!) दुसरे म्हणजे, ही विचारप्रक्रिया आपल्या पूर्वज्ञानाशी विद्यार्थी जोडू पाहतात (ज्ञाननिर्मितीतील ही महत्त्वाची पायरी असते!) तिसरे म्हणजे, आपल्या कल्पनेने विद्यार्थी या पूर्वज्ञानावर स्वार होऊन, ज्ञानाची नवी वीट आधीच्या ज्ञानावर रचू पाहतात आणि नव्या रचनेची नवनिर्मिती करतात. (याला शैक्षणिक तत्त्वज्ञानात 'ज्ञानरचनावाद' असे संबोधतात!) ज्ञानरचनावादी शिक्षणात उपक्रम आणि परीक्षांतील प्रश्न कसे

असायला हवेत, याचा परिपाठच माधुरीताईंनी या ग्रंथाद्वारे दिला आहे.

( ७ ) याच्या पुढील प्रश्न याच प्रकारात मोडणारा तरीही वेगळा आहे. येथे दहा शब्द दिले आहेत. लेकुरे, खीर, पुस्तक, टोळके, चोथा, मडके, सुई, फुसके, सबल, मुंगी. प्रत्येक शब्दातील एक अक्षर काढून त्याजागी दुसरे असे अक्षर योजायचे आहे की त्यातून तयार होणारे नवे दहाही शब्द समानार्थी असतील. माधुरीताईंनी येथे मुलांना 'थोडे डोके चालव' असे म्हटले आहे.

भाषाशिक्षण हा उपयोजित विषय भाषाभ्यासात तसा दुर्लक्षितच राहिलेला आहे. शाळांमधल्या क्रमिक पुस्तकांनी तर त्याचा आवाकाच संकुचित करून ठेवला आहे. आजच्या आपल्या मराठी साहित्यविश्वात, तर साहित्य-निर्मितीच्या शिखरावरच सारे लक्ष केंद्रित झाले आहे. त्याच्या, भाषाशिक्षण या पायाकडे नजरच टाकलेली नाही. 'साहित्यिक', 'वाचक', 'विचारवंत' ही सारी सामाजिक निर्मिती ज्याच्या आधारावर उभी राहात असते तो पाया भाषाशिक्षणाचाच आहे. भाषाशिक्षण-नेमके भाषाशिक्षण-प्रभावी भाषाशिक्षण हा पाया आहे. तो खंबीर असायला हवा. एरवी, आडात नसेल तर पोहऱ्यात येणार नाही. माधुरी पुरंदरे यांचा हा ग्रंथ भाषाजलाच्या आडात मुबलक पाणी कसे भरावे हे सांगणारा ग्रंथ आहे.

यानिमित्ताने एक सूचनाही करायची आहे. आता सर्वच विद्यापीठांतून पदवीपातळीवर 'भाषाशिक्षण'-'भाषेचे शिक्षण' असा नवीन विषय एक 'खास विषय' म्हणून ठेवला जायला हवा. गेल्या तीसेक वर्षांमध्ये भाषाशिक्षणाची सैद्धांतिक बाजू आणि उपयोजित बाजू यांची मांडणी बऱ्यापैकी झाली आहे. मानसभाषाशास्त्र, मज्जाभाषाशास्त्र, विकासक मानसशास्त्र वगैरे भाषेशी संबंधित नवी शास्त्रे-उपशास्त्रे यांनी भाषाशिक्षणालाच नवे परिमाण प्राप्त करून दिले आहे. मुलांचे भाषाशिक्षण प्रभावी होण्यासाठी या विषयाच्या तज्ज्ञ शिक्षकांची मोठी गरज आहे. 'भाषाशिक्षण' या विषयाचे पदवीधर ही गरज भागवू शकतील.

('मराठी अभ्यास परिषदे'तर्फे आयोजित 'महाबँक पुरस्कार वितरण समारंभा'च्या वेळी केलेले अध्यक्षीय भाषण. दि० २१ जानेवारी २०१२) ■



अनुक्रमणिका

# भाषाविज्ञानाचे विस्तारणारे क्षितिज

केतकी मोडक

**भाषाविज्ञानाच्या अभ्यासाची आजची स्थिती :** भाषाविज्ञान म्हटले की चॉम्स्की, ब्लूमफील्ड, सोस्यूर अशी नावे कानावर येऊ लागतात. कधी वर्णनात्मक, कधी ऐतिहासिक, कधी सैद्धांतिक तर कधी उपयोजित, कधी सामाजिक भाषाविज्ञान अशा भाषाविज्ञानाच्या अनेक अंगांचा परिचय विद्यार्थ्याला होऊ लागतो. स्वन, स्वनिम, रूपिम, स्वनांतर इ० संज्ञा समजून घेता घेता दमछाक होते. हा विषय आवडला तर ठीक, नाहीतर गणिताप्रमाणे कायमचा छत्तीसचा आकडा, अशी परिस्थिती याबाबतीत उद्‌भवू शकते. बरं, हा साराच अभ्यास परपुष्ट; आणि समोर शिकणारे विद्यार्थी ज्यांची स्वत:च्या मातृभाषेशीच अजून चांगली नाळ जोडलेली नाही अशा परिस्थितीतले. त्यांच्यासमोर आपल्याच भाषेतील उदाहरणे देऊन काही गोष्टी समजावून सांगायचा प्रयत्न केला तरीही हे काय वेगळेच, असा आविर्भाव त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट वाचता येतो. अशा विद्यार्थ्यांना भाषाविज्ञान शिकविताना, पाश्चात्त्य भाषाविज्ञान आणि त्याचे भाषांतरवजा केलेले मराठीतील लेखन हाच काय तो प्राध्यापकाला आधार! शिकणाऱ्या विद्यार्थ्याला त्यातील आशय कोठेच स्वत:शी जोडल्यासारखा वाटत नाही, तो दूरस्थ वाटत राहतो आणि त्यामुळे त्या विषयात मनापासून रमायला होत नाही. हा बहुधा सार्वत्रिक असा अनुभव आहे.

त्यामुळेच विद्यार्थीदशेत शिकत असतानाच माझ्या मनात विचार येत असत, की हे आपण सारे जे शिकत आहोत तसा विचार, तसा अभ्यास आपल्याकडे भारतात झालाच नाही का? आणि जर का तो झाला असेल तर मग आपण पाश्चात्त्य भाषाविज्ञान का शिकत आहोत? भाषाविज्ञानातील भारतीयांनी केलेले कार्य आपण का अभ्यासत नाही? विद्यार्थी असताना हा प्रश्न माझ्या मनात येत असे.

**'युजीसी मॉडेल करिक्युलम-लिंग्विस्टिक्स'** : आता जेव्हा भाषाविज्ञानाचे अध्यापन करण्याचा योग आला तेव्हा मुळातील या संदर्भातील युजीसीने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचा संदर्भ पाहिला. 'युजीसी मॉडेल करिक्युलम-लिंग्विस्टिक्स' यामध्ये ठरविल्या गेलेल्या अभ्यासक्रमात मुळात पाश्चात्त्य भाषाविज्ञानाचाच समावेश आहे.'[१] त्यावर लेखन करणारे एखाद दुसरा अपवाद वगळता सारे भारतीयेतर आहेत. याचा अभ्यास करण्यासाठी दिलेले संदर्भग्रंथही भारतीयेतरांनी लिहिलेले आहेत.

---

भाषेचा तत्त्वज्ञानात्मक परिप्रेक्ष्यातून विचार (फिलॉसॉफिकल परस्पेक्टिव्ह्ज ऑन लँग्वेज्) या विषयात तरी भारतीयांचे योगदान महत्त्वाचे गणले जाईल अशी अपेक्षा होती. पण तेथेही भारतीय विचारांवर अगदी कमी भर दिलेला आढळतो. 'द वर्ड अॅण्ड द वर्ल्ड : इंडियाज् कन्ट्रिब्युशन टू द स्टडी ऑफ लँग्वेज्' ह्या पुस्तकाचा[२] अपवाद वगळता त्यात लॉयन, मेकॉले, रसेल यांचेच लेखन संदर्भग्रंथ म्हणून दिलेले आहे. पदव्युत्तर अभ्यासक्रमात भारतीय विचाराला केवळ एका प्रकरणाची जागा दिली गेली आहे. म्हणजेच लक्षात घेण्याजोगी गोष्ट अशी की आपला जो भाषाविज्ञानात प्रवेश झाला आहे तो सारा प्रकारच दुसऱ्याच्या बोंडल्याने दूध पिण्यासारखा आहे. अभ्यासक्रमातच त्याचा समावेश नसेल तर विद्यार्थ्यांची आणि शिक्षकांची, पर्यायाने भाषावैज्ञानिकांची आपल्या मुळाकडे दृष्टी वळणार कशी? तशी अपेक्षा तरी कशी बाळगणार?

**प्राचीन भारतीय भाषाशास्त्रावरील ग्रंथ :** नाना पावगी लिखित 'भाषाशास्त्र' या शके १८२३ म्हणजे इ०स० १९०० साली प्रकाशित झालेल्या पुस्तकात[३] भारतीय भाषाशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या मॅक्समुल्लर, हंटर, सेस, मॉनियर विल्यम्स इ० पाश्चात्त्य अभ्यासकांचे आश्चर्योद्गार विपुल प्रमाणात दिलेले आहेत. ही मंडळी आपल्याकडील भाषाविज्ञानाची सखोलता, व्यापकता, सूक्ष्मता पाहून थक्क झालेली आहेत, आपली या क्षेत्रातील निर्विवाद थोरवी आणि पाश्चात्त्यांची या क्षेत्रातील अप्रगत स्थिती मोकळ्या मनाने मान्य करीत आहेत. ह्याच पुस्तकात भाषाविषयक आर्य व पौरस्त्य प्रयत्न या प्रकरणात भाषाविषयक आपल्याकडे झालेला अभ्यास तपशीलवार दिलेला आहे.

नाना पावगी लिखित 'भाषाशास्त्र' आणि मनोहर पंडित लिखित 'प्राचीन भारतीय भाषाशास्त्र' हे दोन ग्रंथ जरी अभ्यासले तरी प्राचीन काळात भारतात याविषयी किती प्रचंड काम झाले होते याची कल्पना येऊ शकेल. भारतीय भाषाविज्ञानाचा विचार करायला गेलो तर आपल्याला तेथे आढळतात, पाणिनी, भर्तृहरी, पतंजली, इ० मंडळी! त्यांच्या भाषाविषयक विचारावर आपल्याकडे मराठीमध्ये किती लिखाण झाले आहे, हे पाहू जाता वानवाच आढळते.

**भारतीय भाषाशास्त्राचा प्रभाव :** जगभरातील भाषाविज्ञानाचा इतिहास पाहायला लागले तर असे आढळले की ज्या सोस्यूर, चॉम्स्की, ब्लूमफील्ड या भाषावैज्ञानिकांचा आपण उदोउदो करतो; त्या सर्वांवरच या ना त्या प्रकारे संस्कृत भाषाविज्ञानाचा प्रचंड पगडा आहे. हे सारेच संस्कृतचे अभ्यासक आहेत.

भर्तृहरीने स्फोट सिद्धान्त मांडला. फ्रांझ बॉपच्या निमित्ताने एकोणिसाव्या शतकात हा सिद्धान्त युरोपात आधुनिक भाषाविज्ञानावर प्रभाव पाडून गेला. ह्या बॉपची दृष्टी खिळलेली होती मूलत: पाणिनीवर. पुढे ह्या साऱ्या भाषाविज्ञानाचा प्रभाव सोस्यूर, ब्लूमफील्ड आणि जॅकॉबसन ह्या मंडळींवर पडला.[४]

लेनर्ड ब्लूमफील्डने पाणिनीच्या व्याकरणाचा उल्लेख 'मानवी बुद्धीचे एक सर्वश्रेष्ठ स्मारक' असा फार गौरवाने केला आहे. इतकेच नव्हे तर स्वत:च्या संशोधनामध्ये पाणिनीय संकल्पना व विश्लेषणपद्धती त्याने वापरलेल्याही आढळतात; असे निरीक्षण प्रा० मिलिंद मालशे यांनी 'आधुनिक भाषाविज्ञान' या पुस्तकात नोंदविले आहे.[५]

फ्रिट स्टॉल याने भारतीय विचारांचा युरोपीय विचारांवरील परिणाम स्पष्ट केला. तो स्पष्ट करताना त्याने म्हटले की, सोस्यूरने मांडलेला 'आयडिया ऑफ फॉर्मल रूल्स् इन् लँग्वेजेस्' हा विचार म्हणजे पाणिनीच्या व्याकरणाशी त्याच्या झालेल्या परिचयाचा परिपाक आहे. त्याने मांडलेली चिन्ह-चिन्हित ही संकल्पनादेखील भर्तृहरीच्या 'स्फोट' या सिद्धान्ताशी मिळतीजुळती आहे. तीन दशके संस्कृतचे अध्यापन करणाऱ्या सोस्यूरवर संस्कृतमधील भाषाविज्ञानाचा प्रभाव असणे अगदी स्वाभाविक आहे.[६]

सोस्यूरने भाषिक व्यवस्था आणि या व्यवस्थेचे एककालिक वर्णन, या तत्त्वांवर आधारलेली भाषाविज्ञानाची चौकट उभी केल्यानंतर भाषिक संरचनेचे नियम निर्धारित करण्याच्या विविध पद्धती विसाव्या शतकात निर्माण झाल्या. या पद्धतींपैकी काही महत्त्वाच्या पद्धतींवर पणिनीय परंपरेचा प्रत्यक्ष प्रभाव पडलेला आढळतो (उदा० ब्लूमफील्डवादी परंपरा) तर इतर काही पद्धतींवर (उदा० चॉम्स्कीवादी पद्धतींवर) प्रत्यक्ष परिणाम नसला तरी त्यात काही सैद्धांतिक साम्यस्थळे आढळतात. ह्या साम्यस्थळांचा सविस्तर परामर्श मिलिंद मालशे यांनी 'आधुनिक भाषाविज्ञान' या ग्रंथात घेतलेला आहे. तो उद्‌बोधक आहे.

वर्णनात्मक लाघव आणि सार्वत्रिक व्याप्ती ही उद्दिष्टे आधुनिक भाषावैज्ञानिकांनी अत्यंत महत्त्वाची मानलेली आहेत, किंबहुना वैज्ञानिक वर्णनाच्या मूल्यमापनाचे ते निकष म्हणता येतील. याबाबतीत पाणिनीच्या शैलीची बरोबरी करणे गणितीय व आकारिक व्याकरणे लिहिणाऱ्या आधुनिक संशोधकांना अजूनही शक्य झालेले नाही, असे मानले जाते, असे मालशे यांनी यासंदर्भात विधान केले आहे.[७]

**चिंतनीय बाब :** विचार करण्यासारखी गोष्ट अशी की, भर्तृहरीने अदमासे इ०स० पूर्व ५००मध्ये मांडलेला सिद्धान्त एकोणिसाव्या शतकात पाश्चात्त्य मंडळी अभ्यासतात. १८९४ ते १९५७ या दरम्यान त्यावर आधारित 'आयडिया ऑफ फॉर्मल रुल्स इन लँग्वेजेस्' ह्याचा उदय होतो. १९२०च्या आसपास 'संरचनावाद' या नावाने तोच विचार जगभरात सर्वत्र पसरतो. आपण अचंबित नजरेने त्याकडे पाहतो. हा साराच प्रकार म्हणजे आपल्याच करंटेपणाचे द्योतक नाही काय?

ऐतिहासिक भाषाविज्ञानाचा पाया घालणारा फ्रांझ बॉप[८] असो की वर्णनात्मक भाषाविज्ञानाचा जनक सोस्यूर असो, हे दोघेही जर पाणिनी व त्या परंपरा अनुसरत असतील तर आपण मात्र त्या परंपरेचे पाईक असूनदेखील या साऱ्या प्रवाहापासून कोरडे



अनुक्रमणिका

कसे राहू शकतो? हे सारे आहे हे लक्षात येऊनही, गतवैभवाकडे केवळ हतबुद्ध नजरेने पाहणे आणि पाश्चात्त्यांच्या ज्ञानपिपासूवृत्तीकडे दूरस्थपणाने पाहणे हेच आपण करणार की या प्राचीन परंपरेतील साहित्यात अवगाहन करून त्यातून आधुनिक काळाला साजेसे असे माणिकमोती आपण वर आणणार, हे आता ठरवणे गरजेचे आहे.

**प्राचीन भाषाशास्त्र आणि भारतीय भाषा :** पाणिनी, भर्तृहरी ह्यांची केवळ पोथीनिष्ठ भूमिका घ्यावी असे मुळीच नाही. पण पाश्चात्त्य विद्वान जर त्यांच्या त्यांच्या भाषांच्या परिप्रेक्ष्यातून त्या विचारांकडे पाहत असतील तर आपण मागे का राहायचे? मराठी भाषक जेव्हा या विचाराकडे वळतील तेव्हा त्यांना त्यातील विचारांचे एका वेगळ्या परिप्रेक्ष्यातून आकलन होणार नाही का? इतर भारतीय भाषांमध्ये असा अभ्यास झाला आहे का आणि त्यातून क्रांतिकारक अशा काही संकल्पनांचा उदय त्या त्या भाषांमध्ये झाला आहे का, याचाही शोध भाषावैज्ञानिकांना घ्यावा लागेल.

**शेखचिल्ली उपद्व्याप :** वेद-उपनिषदांमधील भाषा, त्यांचे द्विस्तरीय उपयोजन, त्यातील प्रतीकात्मकता, गीतेमधील भाषाविचार, परापश्यन्तिमध्यमावैखरी इ० संकल्पना, त्यावरील संतपरंपरेचे भाष्य या साऱ्यांचा वैभवशाली वारसा आपल्याकडे आहे. त्याकडे पूर्णत: दुर्लक्ष करावयाचे आणि पाश्चात्त्यांकडून आलेले ते सर्व श्रेष्ठ या भावनेतून त्यांच्या विचारांची, त्यांच्या सैद्धान्तिक कल्पनांची भलावण करत राहायची हे आपल्यालाच घातक नाही का? फांदीच्या एका टोकावर बसायचे, दुसऱ्या झाडाच्या फांदीकडे बघत बघत त्याची भलावण करायची आणि आपल्या मुळाकडे दुर्लक्ष करायचे, किंबहुना त्याच्यावरच आघात होईल अशी परिस्थिती स्वत:हून निर्माण करायची, हा उपद्व्याप आपण अजून किती काळ करीत राहणार?

**भाषाविज्ञानाच्या विविध अंगांच्या समन्वयाची गरज :** आपल्या ह्या मुळांचे उत्खनन करून, आधुनिक काळातील उपलब्ध प्रभावी तंत्रज्ञानाच्या प्रकाशात त्यांचा नव्याने शोध घ्यायला हवा. वर्णनात्मक आणि सामाजिक भाषाविज्ञान हे महत्त्वाचे आहे जरूर; पण त्यासाठी ऐतिहासिक भाषाविज्ञानाचे बलिदान देण्याची काय गरज? भाषाभ्यासाच्या केवळ एका अंगावर भर दिला तर तो भाषिक अभ्यास दुबळा, पांगळा ठरेल हे विसरून चालणार नाही.

**प्राचीन भाषाशास्त्राच्या अभ्यासाची दिशा :** वेद-उपनिषदे, गीता, गीतेवरील भाष्यग्रंथ, संतवाङ्मय, अव्वल इंग्रजी कालखंडातील भाषिक अभ्यास, आधुनिक भाषाविज्ञान या टप्प्यांमधून भाषाविज्ञान प्रगत होत गेले आहे किंवा अभ्यासिले गेले आहे असे म्हटले तर उलट क्रमाने आता आपली दृष्टी आपण आधुनिक भाषाविज्ञानाकडून संतवाङ्मयाकडे वळवायला हवी.





अनुक्रमणिका

**भाषाविज्ञानाची एक नवी दिशा : संतवाङ्मयांतर्गत भाषाविज्ञान :** 'परेहून परते घर, तेथे राहू निरंतर' असे म्हणणारे संत, 'आता वंदीन वेदमाता । श्रीशारदा ब्रह्मसुता। शब्दमूळ वाग्देवता। महामाया॥१॥ जे उठवी शब्दांकुर। वदे वैखरी अपार। जे नि:शब्दाचे अभ्यन्तर। उकलूनी दावी॥२॥' असे म्हणणारे संत रामदास एक प्रकारे भाषिक विचारच करतात. विसोबा खेचर लिखित 'शडूस्छळि' या ग्रंथात नादबिंदू यांचा काही उल्लेख येतो, विचार येतो. 'आम्हा घरीं धन शब्दांचींच रत्नें' असे म्हणणारे संत तुकाराम जेव्हा प्रसंगोपात्त शिव्यांचा मुबलक वापर आपल्या अभंगात सहजतेने करून जातात तेव्हा ते त्यांचे भाषिक वर्तन आपल्याला विचार करण्यास भाग पाडते. हा भाषाविज्ञानाचा विषय होऊ शकतो. अमृतानुभवात वाचा-ऋण-परिहार या प्रकरणात परापश्यन्तिमध्यमावैखरी या चार वाणींचा आणि त्यापलीकडील तत्त्वाचा सविस्तर विचार येतो. या ग्रंथातच शब्दखंडन या प्रकरणात शब्द, त्यांचा वापर, त्यांचे कार्य, त्यांचे सामर्थ्य, त्यांचा अर्थाशी असलेला संबंध, त्यांची मर्यादा या साऱ्याचा येणारा विचार भाषाविज्ञानाचा विषय ठरू शकतो. संतसाहित्याच्या अनुषंगाने मराठीच्या भाषाविज्ञानाची काही मांडणी करता येणे शक्य आहे का; असाही एक संशोधनाचा विषय ठरू शकतो.

**मराठीचे भाषाविज्ञान :** संतवाङ्मयांतर्गत भाषाविज्ञान ही ज्ञानशाखा ही खऱ्या अर्थाने मराठीचे भाषाविज्ञान म्हणता येईल अशी ठरू शकते. अन्यथा आज आपण मराठीत जे भाषाविज्ञान म्हणून शिकतो ते आधी म्हटल्याप्रमाणे पाश्चात्त्य विचारांचे केवळ भाषांतरण आहे. किंवा फार फार तर असे म्हणता येईल की, पाश्चात्त्य विचारांचे मराठीतील उपयोजन असे त्याचे स्वरूप आहे. ते मराठी भाषाविज्ञान नाही. ह्या विचारांचा मागोवा घेत गेल्यास ही ज्ञानशाखा स्वत: स्वयंपूर्ण शाखाही ठरू शकेल. किंवा आपण जसा उलट क्रमाने विचार करत आहोत तसा विचार करत गेलो तर ती ज्ञानशाखा एक दुवा म्हणूनही काम करू शकेल. वेद-उपनिषदे, गीता यांच्याकडे, उद्गमाकडे घेऊन जाणारा वाटाड्या असाही तिचा विचार करता येईल.

मराठीतील भाषाविज्ञानाचा विचार करताना संतवाङ्मयाचा विचार करण्याचा एक अल्पसा प्रयत्न लेखक कृ०पां० कुलकर्णी यांनी 'भाषाशास्त्र व मराठी भाषा' या पुस्तकात केलेला आढळतो. पण संतांनी योगशास्त्रांतर्गत वर्णांची उद्गमस्थाने दिली, मराठी भाषेचा, देशी भाषेचा गौरव केला आणि भाषेचे व्यवहारोपयोगी सामर्थ्य याकडेच प्रामुख्याने लक्ष दिले, भाषेच्या शास्त्रीय विवेचनाकडे संतांचा कल नव्हता; असा एकंदर त्यांचा अभिप्राय दिसतो. पुढे त्यांनी मराठी भाषेच्या व्याकरणातील दादोबा तर्खडकर, गोडबोले, चिपळूणकर, खरे, दामले इत्यादींचा उल्लेख केला आहे. हे सारे प्रयत्न अपुरे आहेत असे त्यांना वाटते. त्याचे एक कारण ते नोंदवितात : ''मराठीच्या पूर्वीच्या संस्कृत व प्राकृत ह्या भाषांशी जितका परिचय असावयास पाहिजे तितका त्यांचा नसावा, व

त्यामुळेच त्यांनी लिहिलेली व्याकरणे भाषाशास्त्राच्या दृष्टीने इतकी उच्च ठरत नाहीत. ही उणीव भांडारकर, भागवत, राजवाडे व गुणे ह्यांनी दूर केली.''[९] हे त्यांचे विधान विचार करण्याजोगे आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांचे ज्ञानेश्वरीच्या व्याकरणासंबंधातील काम आपल्याला येथे आठवून जाते.

**भाषाभ्यासाचा आनुषंगिक सुपरिणाम :** संतवाङ्मयाकडे भाषावैज्ञानिक दृष्टिकोनातून पाहायचे ठरविले तर आज संतवाङ्मयाकडे ज्या जातीय संदर्भातून पाहिले जाते आणि त्याला जे संकुचित केले जाते ती त्रुटीही दूर होईल. कोणत्याही जातीचा असलेला संत शेवटी मराठी भाषा, भाषिक व्यवहार, त्याचे शब्द आणि अर्थ याविषयी बोलतो आहे हे लक्षात घेतले तर आजच्या अभ्यासकांना भाषिक पातळीवर तरी एका समान व्यासपीठावर समन्वयवादी भूमिकेतून एकत्र येता येईल. अर्थात हा अशा भाषाभ्यासाचा एक आनुषंगिक पण महत्त्वाचा परिणाम असेल.

**भाषाविज्ञानाचा आध्यात्मिक अंगाने विचार :** परा, पश्यन्ति, मध्यमा आणि वैखरी हे वाणीचे चार प्रकार असे म्हटले तर आज चालणारा बहुतांशी भाषाविज्ञानाचा अभ्यास हा वैखरीचा अभ्यास ठरतो. परा, पश्यन्ति, मध्यमा या सूक्ष्म वाणी आहेत. त्यांचाही अभ्यास प्राचीन भारतीय भाषाशास्त्र करते.

संतसाहित्यातील भाषाविषयक विचार हा प्रामुख्याने आध्यात्मिक सत्याच्या मांडणीतील आनुषंगिक विचार म्हणून आलेला आहे. शब्दांची मंत्रशक्ती, शब्दोच्चारणामागील सामर्थ्य, त्यामागील विज्ञान या साऱ्याचाही अभ्यास त्यांनी केला होता असे दिसते. अंत:स्थ आत्म्याच्या प्रकटीकरणाचे एक साधन या दृष्टिकोनातून, अमूर्त, अव्यक्त अशा स्पंदनापासून मूर्त अशा स्पष्टोच्चारित ध्वनीपर्यंतचा प्रवास कसा होतो हे जाणून घेण्यात या साऱ्यांना अधिक रस होता. त्यातही त्यातील अमूर्त अशा भागाकडे या साऱ्यांचे लक्ष होते. कारण त्यांचे साध्य होते तो परेहूनही परता असलेला परमात्मा.

आपण आजच्या काळात वैखरीच्या थोडे पलीकडे जाऊन मध्यमा आणि पश्यन्तीच्या टप्प्याकडे जाऊ शकलो तर, आजच्या विज्ञानाच्या ज्ञानपरिघातही काही मोलाची भर पडू शकेल असे वाटते. शब्दाचा आकार न लाभलेला, वक्त्याच्या मनातला विचार, त्याचा येणारा झटिती प्रत्यय, ही वाणीची अवस्था म्हणजे पश्यन्ति. तिला एखाद्या विशिष्ट भाषेतील शब्दरूप लाभले की ती बनते मध्यमा. ते शब्दरूप मुखातून व्यक्त झाले की ती होते वैखरी.[१०]

**प्राचीन विचारांचे सद्यकाळातील उपयोजन - एक शक्यता :** आता ही पश्यन्ति अवस्था आजच्या विज्ञानाला कशी उपयोगी ठरू शकते ते पाहणे मनोरंजक ठरेल. स्टीव्ह

जॉब्स या वैज्ञानिकाने निर्जीव यंत्राला, संगणकाला सजीव आवाजच नव्हे; तर त्यातील शब्द आणि त्याहीपुढे जाऊन त्याचा अर्थ समजावून घेण्याची जाणीव करून दिली. या व्हॉइस रेकग्निशनवर काम करणाऱ्या यंत्रांच्या बाबतीत त्याला काही समस्या भेडसावत होत्या असे दिसते. शब्द समजणे आणि त्याचा व्यक्तीला अपेक्षित आलेला नेमका अर्थ समजावून त्यानुसार आदेशाचे पालन करणे ही सर्वात महत्त्वाची अडचण होती. कारण माणसे आपापल्या परीने शब्दांचा वापर करीत असतात. त्यात काहीसा स्वर बदलला तरी अनेकदा शब्द तोच असताना त्याचा अर्थ मात्र बदलतो. हे सारे त्या निर्जीव यंत्राला कसे कळणार? शिवाय हे काही फक्त एका भाषेपुरते मर्यादित नाही तर यात जगातील सर्व भाषांचा समावेश करावा लागणार, ही त्या पुढील सर्वात मोठी समस्या होती.[११] यावर त्याने मात केली किंवा नाही, आणि केली असेल तर ती कशी हे कळायला काही काळ थांबावे लागेल.

आता आपल्या लक्षात येईल की हा प्रश्न जो निर्माण होतो तो वैखरीच्या पातळीवरच विचार होत आहे म्हणून. त्यापलीकडे जाऊन म्हणजे पश्यन्तीच्या पातळीवर असताना, जो विचार असतो, ज्याला अजूनही शब्दरूप प्राप्त झालेले नसते त्या पातळीवर जाऊन अर्थवहन, किंवा संदेशवहन झाले तर ही अडचण एकदम सोपी होऊ शकते. कारण त्या पातळीवर भाषिक विविधता असणार नाही, असेल ती सार्वत्रिक संवेदना. असे मानवाकडून होणारे संदेशवहन प्राणी चांगल्या रीतीने ग्रहण करू शकतात हा आपल्या साऱ्यांचाच अनुभव आहे. माणसाच्या मनातील केवळ स्पंदनरूपातील भीतीचा विचार म्हणजे पश्यन्तीच्या पातळीवरील विचार प्राण्यांना सहजतेने जाणवतो आणि त्यामुळे ते आपल्यावर हल्ला करण्यास प्रवृत्त होतात असे प्राणी-अभ्यासक सांगतात. म्हणजे संदेशवहनासाठी वैखरीच कायम आवश्यक असते असे नाही, ही गोष्ट सिद्ध होते.

परा, पश्यन्ति, मध्यमा आणि वैखरी ह्यांचा आध्यात्मिक अंगांने विचार आपल्याकडील ऋषीमुनींनी, संतांनी केला. ह्याचाच अधिक शोध भाषाशास्त्रीय अंगाने आपण घेण्याची आवश्यकता आहे. आपल्याकडील ऋषीमुनी ज्या पातळीवर आध्यात्मिक बाजूने जाऊन पोहोचले होते त्याच पातळीवर चढून जाण्याची ही आजच्या आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञानाची धडपड दिसते.

भारतीयांचे उद्‌गमगामी भाषाविज्ञान आणि पाश्चात्त्यांचे तंत्रज्ञानाधारित भाषाविज्ञान यांचा समन्वय झाला तर मानवाच्या ज्ञानेतिहासात एक नवा अध्याय कदाचित लिहिला जाईल, असे वाटते. अर्थात यासाठी आवश्यकता आहे ती आता आपण पुन:श्च जागे होण्याची!

**संदर्भ :**

( १ ) http://www.ugc.ac.in/policy/modelcurr.html

( २ ) Matilal, B.K. The Word and the World: India's Contribution to the Study of Language. Oxford University Press. Delhi, 1990.
( ३ ) नाना पावगी. 'भाषाशास्त्र', इंदिरा छापखाना, शके १८२३ प्लवनाम संवत्सरे.
( ४ ) मालशे, मिलिंद. 'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन', लोकवाङ्मय गृह, फेब्रुवारी १९९५, पृ० ४८.
( ५ ) तत्रैव, पृ० ५३
( ६ ) तत्रैव, पृ० ४८ व ५३
( ८ ) काळे, कल्याण व सोमण, अंजली. 'आधुनिक भाषाविज्ञान' (संरचनावादी, सामान्य आणि सामाजिक), प्रतिमा प्रकाशन, पुणे. आ० २, एप्रिल २००३, पृ० ३७५.
( ९ ) कुलकर्णी, कृ० पां०. 'भाषाशास्त्र व मराठी भाषा', दि ओरिएंटल बुक एजन्सी, पूना १९२५, पृ० ११.
(१०) केळकर, अशोक. 'वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार', स्नेहवर्धन प्रकाशन, आ० २, २००७, प्रस्तावना, पृ० ९.
(११) परब, विनायक. 'सारे काही सोपे', लोकसत्ता, दि० ११ ऑक्टोबर २०११. ■

## संशोधकांनी शोधला 'आतला आवाज'

लंडन, ता. ९ : मनामध्ये आलेल्या विचारांवरून शब्द तयार करण्याचे तंत्रज्ञान संशोधकांनी विकसित केले आहे! कोमा किंवा स्पीकिंग डिसऑर्डर असलेल्या रुग्णांच्या मनातील विचारांचे विद्युतलहरींत रूपांतर करून संगणकीय मॉडेलद्वारे संबंधित शब्द किंवा वाक्य तयार करण्यात संशोधकांना यश आले आहे. या संशोधनाची माहिती 'पीलॉस बायोलॉजी' या नियतकालिकामध्ये आहे.

कोमामध्ये असलेला रुग्ण ऐकलेल्या शब्दांवर विचार करतो..मात्र बोलू शकत नाही. अशा स्थितीमध्ये तो विचार करीत असलेल्या शब्दांच्या लहरींचे संगणकीय मॉडेल तयार केल्यास त्याचे विचार समजू शकतील, या दिशेने संशोधकांनी विचार सुरू केला.

त्यानंतर विविध वारंवारिता (फ्रिक्वेन्सी) असलेल्या आवाजांना मेंदूतील कोणता भाग कशा प्रकारे प्रतिसाद देतो, याचे संगणकीय मॉडेल संशोधकांनी तयार केले. रुग्णांना एखाद्या शब्दाचा विचार करण्यास सांगण्यात आले व त्याने कोणता शब्द निवडला आहे, हे संशोधकांना संगणकीय मॉडेलद्वारे समजणे शक्य होऊ लागले.

(सकाळ, २ फेब्रुवारी २०१२, पृ० ९)



अनुक्रमणिका

# संगणक : एक शैक्षणिक साधन

कीर्ती टण्णू

‘समुद्राचे गोड पाणी पिण्यासाठी भाविकांची गर्दी’, ‘समुद्रात हिरे गोळा करण्यासाठी लोकांची चेंगराचेंगरी’, ‘दिल्लीत माकड-मानवाचा धुमाकूळ’ अशा बातम्या नेहमीच कानावर पडतात, घराघरातून मुलं कमीतकमी आठ वर्षे विज्ञान शिकलेले आहेत किंवा शिकत आहेत... तरी! ‘गरोदर स्त्रीने ग्रहणकाळात भाजी, फळं कापू नये, बाळाचे नाक, कान, ओठ कापले जातात’, किंवा ‘रक्त हृदयात शुद्ध होते’ अशाप्रकारचे अनेक ग्रह सुशिक्षित लोकांमध्येही दिसतात. ‘मिनरल वॉटरमध्ये ३०० टक्के अधिक ऑक्सिजन’ किंवा ‘...तेल कोलस्टेरॉलरहित’ अशाप्रकारच्या जाहिराती. ‘पृथ्वी तबकडीसारखी आहे’ हे दहावी गुणवत्तायादीत चमकलेल्या विद्यार्थिनीचे उत्तर, तर ‘हृदय पोटात असते’ हे एम्०ए०च्या विद्यार्थ्याचे मत!

अशाप्रकारचे अनुभव विज्ञान शिकलेल्या विद्यार्थ्यांकडून यायला लागले की शालेय विज्ञानशिक्षणाचा पुनर्विचार व्हायला हवा, असे वाटते. या सगळ्या प्रसंगांवरून विज्ञानाची तत्त्वे, नियम, संकल्पना समजण्यात, समजावण्यात कुठेतरी चुकतेय असे लक्षात येते. म्हणून विज्ञानशिक्षणाची चिकित्सा व्हावी, विज्ञानशिक्षणासाठी भाषेला पूरक अशी इतर आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित माध्यमे उपयोगात आणावीत, असे वाटते.

विज्ञान-साक्षरतेशी संबंधित समस्यांची उकल, आनंददायी शिक्षणातून होऊ शकते. शैक्षणिक साहित्य वापरून विज्ञानशिक्षण आनंददायी आणि परिणामकारक होते. It has been proved that an activity that motivates children also leads to successful learning and that motivation is strongly linked to the child's involvement in the learning process. (अध्ययनप्रक्रियेत विद्यार्थ्यांचा सहभाग असेल तर ते अध्ययन त्याला प्रोत्साहित करते. अशा प्रोत्साहित करणाऱ्या कृतीमुळे शिकणे अधिक परिणामकारक होते. हेच प्रोत्साहन त्याला शिकण्याच्या प्रक्रियेत सामील करते. (अॅथनासोस, जे० आणि व्हॅसलाइस, के० २ फेब्रुवारी २००१).

आज शाळांतून विविध पद्धतीने विज्ञानाचे अध्ययन, अध्यापन केले जाते. यात प्रामुख्याने प्रात्यक्षिके, चित्र, तक्ते, नकाशे, २-डी, ३-डी प्रतिकृती, दृक्श्राव्य माध्यमे: ध्वनिफिती, चित्रफिती इत्यादींचा समावेश असतो.



अनुक्रमणिका

**चित्र :** छापील मजकुरापेक्षा चित्र, तक्ते, आकृत्यांमुळे संप्रेषण अधिक परिणामकारक होते. एका चित्रातून हजारो शब्द व्यक्त होतात. चित्रांचा वापर माणूस हजारो वर्षांपासून करीत आला आहे. विचारपूर्वक काढलेली चित्रे विज्ञान शिकण्यास फायदेशीर ठरतात. परंतु गुंतागुंतीची रचना, गती, हालचाल असलेल्या संकल्पना, रचना, तत्त्व फक्त चित्रांच्या साहाय्याने समजणे कठीण असते. जशी अणूची संरचना, प्राण्यांचे श्वसन व रक्ताभिसरण, यंत्रांची कार्ये. काही विषय समजण्यासाठी त्यातील अमूर्त संकल्पनांचे कल्पनाचित्र रेखाटणे गरजेचे असते. हे प्रत्येक विद्यार्थ्याला जमतेच असे नाही. शिवाय ते काय कल्पनाचित्र रेखाटत आहेत हे कळत नाही. त्यामुळे त्यावर आधारित विषय समजत नाहीत. यासाठी चलित प्रतिकृतींची गरज भासते. परंतु चलित प्रतिकृती शाळेत वापरणे सोपे नाही. कारण ५० ते ६० विद्यार्थ्यांच्या वर्गात प्रात्यक्षिक करण्यासाठी प्रतिकृती मोठ्या असाव्या लागतात. त्या ठेवण्यासाठी मोठी जागा लागते. शिवाय त्या महाग असतात. त्यामुळे शिक्षक त्या वापरण्याचे टाळतात. प्रतिकृती लहान असेल तर प्रत्येक विद्यार्थ्याला समजावून सांगणे शिक्षकांना शक्य होत नाही; कारण वर्गात ५० ते ६० विद्यार्थी असतात आणि ३० मिनिटांची तासिका. आणि प्रत्येक संकल्पनेसाठी चलित प्रतिकृती विकत घेणे शाळेला शक्य नाही. सगळ्यात मोठी अडचण म्हणजे अशा प्रतिकृती बाजारात उपलब्ध नाहीत.

**प्रयोग :** विज्ञानशिक्षणात प्रात्यक्षिकांचा महत्त्वाचा वाटा असतो. प्रात्यक्षिक करताना विद्यार्थी स्वत: किंवा लहानलहान गटांत वस्तूंचे प्रतिकृतींचे निरीक्षण करतो, त्या हाताळतो किंवा त्या तयार करतो. प्रात्यक्षिके विद्यार्थ्यांना विज्ञान शिकण्यासाठी प्रोत्साहित करत विज्ञानाची गोडी वाढवते आणि शिक्षण आनंददायी बनवण्याबरोबरच प्रयोगशाळेतील साहित्याची हाताळणी कशी करावी, वैज्ञानिक पद्धती कशा वापराव्यात हेही शिकवते. प्रात्यक्षिकांमुळे वैज्ञानिक दृष्टिकोन विशाल होण्यास मदत होते. (हडसन १९९०.) प्रात्यक्षिक करण्याचे अनेक फायदे असले तरी प्रत्येक वेळी ते शाळेच्या प्रयोगशाळेत करणे शक्य नसते. काही वेळा ते धोकादायक असते. कधी खर्चिक असते तर कधी नैतिकतेला धरून नसते. जसे सोडियम धातूच्या रासायनिक अभिक्रिया, पोटॅशियम सायनाईडसारख्या विषारी रसायनांच्या अभिक्रिया, प्राण्यांचे डिसेक्शन. तसेच प्रयोगशाळेत रासायनिक अभिक्रिया करताना त्या रसायनांच्या रेणूंची रचना दाखवता येत नाहीत किंवा विच्छेदन करताना अतिसूक्ष्म भाग दाखवता येत नाहीत. शिवाय ही प्रात्यक्षिके परतपरत करण्यास मर्यादा पडतात.

**निरीक्षण :** नैसर्गिक प्रक्रियांचे सखोल निरीक्षण व त्यांच्या नोंदी ठेवणे, ही सुद्धा विज्ञान शिकण्याची पद्धत आहे. जसे चंद्र, सूर्य ग्रहणे. ग्रहणकाळात सावल्यांचे निरीक्षण करणे, तापमानातील बदलांच्या नोंदी ठेवणे, प्राण्यांच्या वर्तणुकीतील बदलांचे बारकाईने

निरीक्षण करणे. या पद्धतीने ग्रहणाचे परिणाम अधिक चांगले अभ्यासता येतात. पण एकाच ठिकाणी ग्रहणे वारंवार दिसत नाहीत. शिवाय ग्रहणकाळ सुद्धा खूप लहान असतो. सूर्यग्रहणकाळ तर काही मिनिटांचा असतो.

**संगणकाद्वारे सजीवीकरण (ॲनिमेशन) :** वरील सर्व शैक्षणिक साहित्य-वापरातील अडचणींवर संगणक ॲनिमेशनने मात करता येते. ॲनिमेशनचा वापर करून विज्ञानातील संकल्पना, नियम, तत्त्व, प्रयोग दाखविता येतात, हाच त्याचा मोठा फायदा आहे. यासाठी २-डी, ३-डी सॉफ्टवेअरचा उपयोग करतात. क्लिष्ट रचना, कार्य, गती, हालचाल जसे अणू संरचना दाखवताना इलेक्ट्रॉन्सची गती त्यांच्या कक्षा, ग्रह, सूर्यमाला, प्राण्यांमधील श्वसन, रक्ताभिसरण, हृदयाची रचना, जनरेटर, डायनामो, बायोगॅस प्लांटची रचना व कार्य याद्वारे सहजतेने दाखवता येते. परिणामकारक संप्रेषणासाठी ते हव्या त्या कोनातून, लहानमोठे करून दाखवता येते. शिवाय गरजेनुसार परतपरत, हवे तेवढ्या वेळा बघता येते. प्रत्येक वेळा प्रत्येकाला तीच माहिती तेवढ्याच परिणामकारकतेने दाखविली जाते. भाषेचा अडथळा नसल्यामुळे सर्व विद्यार्थ्यांना, विशेषत: मूकबधिर विद्यार्थ्यांसाठीही एकच ॲनिमेशन पॅकेज वापरता येते. हे पॅकेज तयार करताना ॲनिमेशन, व्हिडिओ शूटिंग, फोटो, चित्र, आकृत्या, आलेख, नकाशे, म्युझिक आणि वृत्तान्त इत्यादी समाविष्ट करता येतात. उदाहरणार्थ, रासायनिक अभिक्रिया शिकवण्यासाठी प्रयोगशाळेतील व्हिडिओ शूटिंग, त्याचे स्पष्टीकरण दाखवणारे रेणूसूत्र, त्यांची रचना एकाच वेळी दाखवता येते. प्राण्यांचे ॲनिमेटेड शवविच्छेदन प्रत्यक्ष शवविच्छेदनास पर्याय ठरू शकते. ॲनिमेटेड प्रतिकृतीमुळे प्रत्यक्ष घडणाऱ्या घटना, त्यामागील संकल्पना, तत्त्व, नियम एकत्रितपणे शिकता-शिकवता येतात. एरवी त्या दाखवता येतीलच असे नाही. प्रयोगशाळेत दाखवता न येणारे प्रयोग संगणकावर ॲनिमेटेड प्रतिकृतींनी केल्यास त्याचा माफक फायदा होतो.

संगणकाच्या सुरुवातीच्या काळात शाळेतील संगणक मूलभूत अवस्थेत होते. त्यांची मेमरी, CPU ची (Central Processing Unit) क्षमता खूपच कमी असायची. शिवाय संगणक वापरणे प्रशिक्षणाशिवाय अवघड असे. आता शाळेतील संगणकांचे सीपीयू शक्तिशाली आहेत. हे संगणक जलद काम करतात. मेमरी जास्त असल्यामुळे त्यात मोठे प्रोग्राम सामावतात. आठ बीट प्रोसेसर आता चौसष्ट बीट झाला आहे. आधुनिक ग्राफिक हार्डवेअरमुळे संगणक वापरण्याचे क्षेत्र वाढले. लेझर सीडी तंत्रज्ञानामुळे संगणक प्रोग्राम सीडीवर मावतात आणि सीडीची कॉपी पाच-दहा मिनिटात होते. सुरुवातीच्या काळातील संगणक, त्याचे हार्डवेअर, सॉफ्टवेअर यांच्या किमती शाळेला परवडणाऱ्या नव्हत्या. परंतु आधुनिक तंत्रज्ञानाच्या मदतीने संगणकाच्या किमती खूपच कमी झाल्या आहेत. आता बहुतेक शाळांतून संगणक आहेत आणि विद्यार्थ्यांच्या घरी संगणक असण्याचे प्रमाणसुद्धा बरेच मोठे आहे. बहुतेक विद्यार्थी व शिक्षक संगणकसाक्षर आहेत.



अनुक्रमणिका

सगळ्यात महत्त्वाची गोष्ट म्हणजे राज्यशासन, केंद्रशासन संगणकाचा वापर शिक्षण क्षेत्रात जास्तीत जास्त व्हावा म्हणून शाळा, संस्था यांना प्रोत्साहन देत आहेत. शिक्षणक्षेत्रात ICT मुळे (Information Communication Technology) आमूलाग्र क्रांती घडत आहे. या संदर्भातील 'राष्ट्रीय धोरण' शालेय शिक्षण आणि साक्षरता विभाग, मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांच्यातर्फे जाहीर करण्यात आले आहे. या धोरणानुसार राज्याकडून प्रत्येक शाळेस जास्तीत जास्त ICT सोईसुविधा उपलब्ध करून दिल्या जातील. एका संगणकावर दोनपेक्षा जास्त मुले असणार नाहीत, प्रत्येक शाळेत संगणक कक्ष असेल.

संगणक ॲनिमेशनच्या मदतीने, शाळेत विज्ञान शिकणे - शिकवणे निरनिराळ्या पाच पद्धतीने शक्य आहे.

( १ ) वर्गात विज्ञानशिक्षकांनी पाठ शिकवल्यावर तो विद्यार्थ्यांनी संगणकावर छोट्या गटातून पाहावा.

( २ ) विज्ञानशिक्षकांनी पाठ शिकवत असताना विद्यार्थ्यांनी तो संगणकावर पाहावा.

( ३ ) विज्ञानशिक्षकांचा पाठ वर्गात शिकवून झाल्यावर त्याच आठवड्यात विद्यार्थ्यांनी संगणकावर पाहावा.

( ४ ) विज्ञानशिक्षकांनी वर्गात पाठ शिकवल्यावर तो विद्यार्थ्यांनी संगणकावर जमेल तेव्हा पाहावा.

( ५ ) संगणक-ॲनिमेशन्स LCD प्रोजेक्टरवर पाहावे.

शाळेत संगणक-ॲनिमेशनच्या मदतीने विज्ञान शिकवणे कोणत्या पद्धतीने अधिक परिणामकारक होईल, हे शोधण्यासाठी वरील १,२,३ या पद्धती तपासल्या. इयत्ता सातवीच्या वर्गाची प्रकल्पपूर्व परीक्षा घेऊन त्यातील गुणांच्या आधारे विद्यार्थ्यांचे तीन गट केले.

इयत्ता सातवीच्या विज्ञान पाठ्यपुस्तकातील 'श्वसन व रक्ताभिसरण' या पाठावर आधारित ॲनिमेशन पॅकेज तयार केले. या पॅकेजच्या साहाय्याने तीनही गटांना वेगवेगळ्या वेळी शिकवले. तीनही गटांतील विद्यार्थ्यांची प्रकल्पोत्तर परीक्षा एकाच वेळी घेतली. शिकवलेल्या पाठाचे आकलन किती झाले, हे तपासण्याच्या उद्देशाने परीक्षेचे प्रश्न तयार केले. सर्व प्रश्न वस्तुनिष्ठ होते. परीक्षेचे माध्यम मराठी होते. परीक्षेत मिळालेल्या गुणांचे विश्लेषण करून सर्वाधिक परिणामकारक पद्धत निवडली. तसेच विज्ञान संगणकांच्या मदतीने शिकवण्याबाबत शाळेतील विज्ञान-शिक्षक आणि मुख्याध्यापक यांची मते (प्रश्नावलीच्या साहाय्याने) जाणून घेतली. शिवाय अशा पद्धतीने शिकण्यातील संभाव्य अडचणींना कसे तोंड देता येईल, यावरही चर्चा केली.

**निष्कर्ष :** प्रकल्प पूर्वपरीक्षेत ९ गुण मिळवणारे तीन विद्यार्थी होते. हे विद्यार्थी वेगवेगळ्या गटांत होते. पहिल्या पद्धतीने शिकलेल्या विद्यार्थ्याला प्रकल्पोत्तर परीक्षेत ९.५ गुण, दुसऱ्या पद्धतीने शिकलेल्या विद्यार्थ्याला ८ गुण तर पद्धत तीनने शिकलेल्या विद्यार्थ्याला ७ गुण मिळाले. अशा प्रकारे सर्व विद्यार्थ्यांच्या गुणांचे तौलनिक विश्लेषण केले. त्यातून असा निष्कर्ष निघाला की पद्धत १ - 'वर्गात विज्ञानशिक्षकांनी पाठ शिकवल्यावर तो पाठ विद्यार्थ्यांनी संगणकावर छोट्या गटातून पाहावा,' ही सर्वात परिणामकारक पद्धत आहे.

**संदर्भ :**


(१) ॲथनासोस, जे० आणि व्हॅसलाइस, के० २ फेब्रुवारी २००१. द एन्सायक्लोपीडिआ ऑफ एज्युकेशन मिडिआ कम्युनिकेशन अँड टेक्नॉक्लॉजी. कॉम्प्युटर अँड एज्युकेशन व्हॉल्युम ३६, पृ० १८३ ते २०४.

(२) http://www.sciencedirect.com/science/article/pii/SO360131500000592

(३) डुबे आणि अधिकारी, १९९९. जर्नल ऑफ एज्युकेशनल टेक्नॉलॉजी व्हॉल्युम २.

(४) ड्वॉयर, एफ०एम०, १९७०. कम्युनिकेशन रिव्ह्यू, १८, पृ० २३५ ते २४७.

(५) गेबल, डी०एल० सॅम्युअल, के०व्ही० हुन, दी. १९८७. जर्नल ऑफ केमिकल एज्युकेशन, ६४, ६९५ ते ६९७.

(६) गौतम, व्ही०के० १९९९. जर्नल ऑफ एज्युकेशन टेक्नॉलॉजी व्हॉल्युम २.

(७) रिबर, एल०पी० १९९०. जर्नल ऑफ एज्युकेशनल सायकॉलॉजी, ८२, १३५ ते १४०.

(८) रिबर, एल०पी० १९९१. जर्नल ऑफ एज्युकेशनल सायकॉलॉजी, ८२, ३१८ ते ३२८.

(९) संगर, एम०जे० १९९७. जर्नल ऑफ केमिकल एज्युकेशन, ७४, ८१९ ते ८२३.

(१०) संगर, एम०जे० २०००. जर्नल ऑफ केमिकल एज्युकेशन, ७७, ७६२ ते ७६६.

(११) मराठी नियतकालिक : 'शिक्षण संक्रमण', जुलै २०१०.


■

कविवर्य ग्रेस यांचे दि० २६ मार्च २०१२ला पुणे येथे निधन झाले. त्यांना परिषदेतर्फे भावपूर्ण श्रद्धांजली.

# म्हणींचे दूर्वांकुर

मा०ना० आचार्य

कोणत्याही भाषेची श्रीमंती ही अन्य अनेक घटकांबरोबरच तीमधील शब्दांच्या वाच्यार्थापलीकडे जाणाऱ्या शब्दव्यापारावरही अवलंबून असते. म्हणूनच भाषेतील वाक्‌संप्रदाय (यामध्ये म्हणी, वाक्‌प्रचार, सुवचने, न्याय इत्यादींचाही समावेश होतो.) विचारणीय ठरतात. लोकरूढ अशा अनेक म्हणींचा मूळ कर्ता म्हणून कुणा एकाच व्यक्तीचा उल्लेख करता येत नाही. कारण म्हणींमागे प्रदीर्घ अनुभवांची साठवण करणारे एका समाजपुरुषाचे मन असते. अशा साठवणीची प्रासयुक्त शब्दांत केलेली गोठवण म्हणजेच म्हण.

वाक्‌संप्रदाय या शब्दातील एका घटकाला घेऊन विचार करावयाचा झाल्यास त्या समाजपुरुषाला 'संप्रदाय-पुरुष' असेही म्हणता येईल. एखाद्या भव्य प्रासादाच्या तळकोपऱ्यात जसे वास्तुपुरुषाचे तसे भाषेच्या पायात असणारे या संप्रदायपुरुषाचे वास्तव्य भाषेच्या व्यवहारात सतत जाणवत असते. हा संप्रदायपुरुष रूढ सांप्रदायिक विचारांचा व पुरुषी मानसिकतेचा असतो. त्याच्या तोंडून त्या त्या काळातील समाजाचे सांस्कृतिक वर्तन व्यक्त होते. त्यामध्ये अनेक वाक्‌संप्रदायांत स्त्रीगौरवाबरोबरच, किंबहुना अधिकांशाने स्त्रीच्या चारित्र्याचा जमाखर्च मांडलेला मिळतो.

एका रूढ म्हणीचा मागोवा घेत गेलो, तेव्हा वरील विचारांना प्रेरणा देणारी भाषेची एक मौज अनुभवायास मिळाली. त्या मौजेतूनच जन्मलेला हा लेखनप्रपंच आहे. ती रूढ म्हण अशी : 'ऋषीचे कूळ व नदीचे मूळ शोधू नये.' काय सुचवावयाचे आहे येथे? अनेक ऋषींचा जन्म हीन मानलेल्या कुळांत झालेला आढळतो. नदीचा उगम शोधला तर एखादी बोटभर जलधारा वा क्वचित एखादा गढूळ नाला मिळतो. म्हणून हा उपद्व्याप करण्यापेक्षा ऋषींचे तप:सामर्थ्य व नद्यांच्या विशाल रूपांनी फुलविलेल्या संस्कृतींची समृद्धी इकडे लक्ष देणे अधिक योग्य आहे.

हा सूचितार्थ योग्यच आहे. परंतु या म्हणीचेच मूळ का शोधू नये? म्हणून थोडा उपद्व्याप केला, तेव्हा पुढील श्लोक मिळाला :

ऋषीणां च नदीनां च कुलानां च महात्मनाम् ।
प्रभावो नाधिगंतव्य: स्त्रीणां दुश्चरितस्य च ॥

(महाभारत - उद्योग० ३५.६२ भांडारकर प्रत)

येथे ऋषी, नद्या, महात्मे यांच्या पंक्तीला स्त्रियांच्या दुराचरणालाही आणून ठेवले आहे!

श्वन्, युवन् व मघवन् यांना एकाच सूत्रात गुंफणाऱ्या पाणिनीवरही ही कडी केलेली आहे. (टीप एक पाहा) हा श्लोक 'विदुरनीती'मध्ये आलेला आहे. येथे केलेली स्त्रीचरिताची जोडही गमतीदारच म्हणायला हवी. कारण अनेक ऋषींच्या 'न एतद् वाच्यम्' या कोटीतील जन्मांशी हे तथाकथित स्त्रीचरित कार्यकारणभावाने जोडले गेलेले आढळते.

या जोडाजोडीत आणखी एक गर्भित सूचना आहे. स्त्रीच्या दुराचरणाकडे न पाहता तिच्या केवळ सौंदर्याकडे पाहावे. कारण या सौंदर्यप्रभावामुळेच महाभारत घडले (व बिघडलेही). उर्वशीसारख्या सौंदर्यवती अप्सरेपोटी अगस्त्य जन्मला व त्याने आपल्या अतुलनीय सामर्थ्याने देवांना साहाय्य केले. (टीप दोन पाहा)

ही 'पुराणातली वांगी' पुराणातच ठेवली तरी इतिहासातील बाजीराव-मस्तानी आठवायला हरकत नसावी. (टीप तीन पाहा) उपरोक्त श्लोकात स्त्रीच्या दुश्चरिताचा उल्लेख करताना तिचा सौंदर्यप्रभाव सूचित करणारा हा संप्रदायपुरुष तिच्याही 'दुष्कुला'कडे दुर्लक्ष करण्यास तयार आहे. उदा० पुढील श्लोक पाहा-

विषादप्यमृतं ग्राह्यं, अमेध्यादपि कांचनम् ।
नीचादप्युत्तमां विधां स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ॥
(सुभाषितरत्नभांडागारम् - १९२९, पृ०१६१, क्र० ९६)

आता यातीलच काही घटक बदलून मिळणारे 'मनुस्मृती'तील श्लोक असे -

विषादप्यमृतं ग्राह्यं, बालादपि सुभाषितम् ।
अमित्रादपि सद्वृत्तं, अमेध्यादपि कांचनम् ॥
श्रद्दधानः शुभां विधां, आददीता वरादपि ।
अंत्यादपि परं धर्मं स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ॥ (मनु० २. २३८ व २३९)

म्हणजे येथेही बाकी घटक मागेपुढे झाले तरी 'स्त्रीरत्न' आहेच. स्त्रीरत्न म्हणजे सुंदर स्त्री. अशी स्त्री जरी तथाकथित उच्चकुळातली नसली तरी मीलनार्थ स्वीकारार्ह आहे. संप्रदायपुरुषाचे नीतिशास्त्र असे आहे!

हाच संप्रदायपुरुष स्त्रीचरित्राची गूढगहनता सांगताना म्हणतो,

राष्ट्रस्य चित्तं कृपणस्य वित्तं मनोरथं दुर्जनमानुषाणाम् ।
स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं देवो न जानाति कुतो मनुष्यः ॥
(सुभाषितं १७९.८२९)

'राष्ट्र म्हणजे त्यामधील सामान्य जनता. ही जनता केव्हा बिघडेल ते काही सांगता येत नाही. तिचा एकाएकी होणारा उपद्रवकारक उद्रेक सर्वांच्या परिचयाचाच आहे. 'स्त्रीचरित्र' म्हणजेही 'स्त्रीचे कपटी आचरण' असा विशिष्ट अर्थ कोशकर्ते देतात.



अनुक्रमणिका

(मोल्सवर्थ, मराठी शब्दकोश)

आपल्या अनेक कथांतून व्यक्त होणारे संप्रदायपुरुषाचे मन म्हणूनच स्त्रियांपासून दूर राहावे असा उपदेश करण्यासही विसरत नाही. (टीप चार पाहा)

चक्रधर स्वामींच्या सूत्रांतही हाच उपदेश मिळतो. त्यांचा एक शिष्य भिक्षा मागण्यासाठी एका घरी जाई. त्या घरची बाई तो आला की त्याला आत घेऊन दार लावी व त्याच्याजवळ गप्पा मारीत बसे. त्यामुळे त्याला मठात येण्यास उशीर होई. चक्रधरांना हे कळले तेव्हा ते म्हणाले, 'पोरा, जेणें संबंधें विकारु उपजे ते याचा असंबंधु की जे.' (लीळाचरित्र. उत्तरार्ध १०९) (टीप पाच पाहा).

चक्रधरांच्या एका शिष्याने त्यांना एकदा विचारले, 'विखो सेवितां पाप नव्हे, तरि धर्मापासौनि निरपौनि कां काढे?' त्यावर चक्रधर सांगतात, 'भोजे या, स्त्री भणिजे मत्त द्रव्यांचा रावो गा. आणिकें द्रव्यें सेविलियां माजवीती, स्त्री दर्शनमात्रेंचि माजवी...' (लीळाचरित्र. उत्तरार्ध १११)

चक्रधरांचे आणखी एक वचन पुन्हा एका संस्कृत श्लोकाकडे नेते; ते असे-

'स्त्रियांसि अष्टगुण कामु' ('अज्ञातलीळा' क्र० १३९)

संस्कृत श्लोक असा-

आहारो द्विगुणः स्त्रीणां बुद्धिस्तासां चतुर्गुणा ।

षड्गुणो व्यवसायश्च कामश्चाष्टगुणः स्मृतः ॥ (हितोपदेश ४.३)

आता या श्लोकामागील कथाही मोठी गमतीशीर आहे. कारण हा श्लोक एका स्त्रीनेच तिच्या पतीला ऐकविला आहे. एक व्यापारी होता. त्याची बायको घरातील एका सेवकाशी रममाण होई. त्या व्यापाऱ्याने तिला एकदा त्या सेवकाचे चुंबन घेतानाच पाहिले. पण ती बाई कसली वस्ताद! ती नवऱ्याला म्हणाली, 'नाथ, या सेवकाला काढून टाका. हा चोरून कापूर खातो. आत्ताच मी त्याच्या तोंडाचा वास घेऊन खात्री करून घेतली.' एवढे सांगून आपल्या चतुर्भुज बुद्धीचा टेंभा मिरविण्यासाठी तिने उपरोक्त सुभाषित नवऱ्याला ऐकविले. आता तो सेवकही चटावलेलाच होता. त्याने राग आल्याचे नाटक केले व तो काम सोडून चालू लागला. व्यापाऱ्याने त्याची कशीबशी समजूत घालून त्याला थांबविले. त्या 'बंधकी'लाही तेच हवे होते.

(बंधकी = व्यभिचारिणी स्त्री. हा शब्द मूळ कथेतच योजलेला आहे. नोकराला 'चटावलेला' म्हटले, कारण चक्रधरांच्याच शब्दांत सांगावयाचे म्हणजे - 'स्त्री भणिजे मेंढि एचें खाजें' (लीळाचरित्र, उत्तरार्ध ५०६).)

असे हे 'स्त्रीचरित्र'. याच्या उल्लेखातून जसे चक्रधर सुटले नाहीत, तसे वारकऱ्यांचे ज्ञानदेवही सुटलेले नाहीत. सोळाव्या अध्यायामध्ये आसुरी संपत्तीच्या दंभादिक सहा दोषांचा उल्लेख केल्यानंतर ज्ञानदेव म्हणतात,

इहींच साही दोषांगीं । हे आसुरी संपत्ति दाटुगी ।
जैसें थोर विषय सुभगे अंगीं । अंग सानें ॥ (१६.२५३ दांडेकर प्रत)
भावार्थ-

या दंभादी सहा दोषांच्याच अंगांनी ही आसुरी संपत्ती बलवान झाली आहे. एखादी स्त्री शरीराने लहानसर असली तरी तिच्यात कामेच्छा फार असते. (टीप सहा पाहा.)

दूर्वांकुरांचे वर्णन करताना म्हणतात,

'काण्डान् काण्डान् प्ररोहन्ति सहस्रेण शतेन च।' म्हणींनाही हेच वर्णन लागू पडते.

**टिपा :**

**(एक)** श्वन् (कुत्रा) युवन् (तरुण पुरुष) व मघवन् (इंद्र) यांची विभक्तिरूपे करताना काही ठिकाणी 'व'चे रूपांतर 'उ'मध्ये होते हे सांगणारे पाणिनीचे एक व्याकरणसूत्र आहे. (श्वयुवमघोनामतद्धिते - ४.४.१३३). स्त्रिया मंगळसूत्रामध्ये काच, रत्न व सुवर्ण यांनाही एकाच सूत्रात गुंफतात. त्यावरून श्लेष साधणारे एक गमतीदार सुभाषित असे आहे -

काचं मणिं कांचनमेकसूत्रे
मुग्धा निबध्नन्ति किमत्र चित्रम्।
विचारवान् पाणिनिरेकसूत्रे
श्वानं युवानं मघवानमाह ॥

**(दोन)** व्यास हे महाभारताचे कर्ते. त्यांचा जन्म एका कोळिणीच्या पोटी झाला. मत्स्यगंधा व पराशर यांची कथा स्त्रीसौंदर्याचा प्रभावच सुचविते. (महा० आदि० ५७ भांडारकर)

उर्वशी ही अप्सरा. परंतु 'अप्सरा म्हणजे देववेश्या' असे सायणाचार्यांनी नोंदले आहे. (ऋग्वेद - १०.९५.७ वरील भाष्य) स्वत: उर्वशीनेही ते मान्य केले आहे. म्हणूनच ती अर्जुनाला म्हणते, 'आम्ही सदैव उघड्याच असतो.' (महा० वन० ४६.४२), चित्रशाळा प्रत. भांडारकर प्रतीत हा श्लोक नाही.)

या उर्वशीला पाहून मदनपीडित वरुण आपले रेत तिच्या 'कुंभात' टाकतो. नंतर त्याच कुंभात मित्रही तोच उद्योग करतो. या कुंभातून जन्मतात - वसिष्ठ व अगस्त्य. यांपैकी वसिष्ठाकडे ऋग्वेदाच्या सातव्या मंडलाचे कर्तृत्व जाते. याच मंडलात उपरोक्त उर्वशीचा संदर्भही येतो. (ऋग्वेद ७.३३.११) अगस्त्याचे पराक्रम प्रसिद्ध आहेत. त्याने विंध्य पर्वताला नमवून दक्षिणेकडे जाण्याचा मार्ग मोकळा केला. बोकड बनलेल्या वातापी राक्षसाला खाऊन पचवून टाकला. समुद्र पिऊन त्यात लपून बसलेल्या कालकेय राक्षसांना उघड्यावर आणले व देवांकडून त्यांचा वध करविला. (वाल्मीकि रामायण, उत्तरकांड



अनुक्रमणिका

सर्ग ५६ व ५७).

**(तीन)** 'पुराणातली वांगी पुराणात'- ही म्हण प्रसिद्ध आहे. पुराणात दिलेली उदाहरणे तेथेच ठीक. व्यवहारात त्यांचा वापर केला जात नाही. - हा त्या म्हणीचा सूचितार्थ. (Mighty in talk, slack in act.) या म्हणीच्या स्पष्टीकरणार्थ एक गोष्टही सांगितली जाते. पुराण सांगणारे एक पुराणिक चातुर्मासात खाण्यास वर्ज्य पदार्थांमध्ये वांग्याचा उल्लेख करतात. एकदा एका श्रोत्याकडे जेवावयास गेले असताना त्यांना भरल्या वांग्यांच्या भाजीचा वास येतो. त्यामुळे त्यांची जीभ चाळवते. ते ती वांगी मागतात. श्रोता त्यांना त्यांच्याच उपदेशाची आठवण देतो. त्यावर ते म्हणतात, 'पुराणातली वांगी पुराणात. व्यवहारात त्याचे काय?' (दाते-कर्वे संपादित, महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश- खंड २, पृ० २१०).

वस्तुतः येथे 'वांगी' ऐवजी 'वानगी' असा शब्द आहे. वानगी म्हणजे नमुना, उदाहरण. बोलभाषेत वानगीची वांगी झाली व एक कथाही जन्माला आली. या घटनेचा उल्लेख पूर्वी केला गेलेला आहे. (पाहा- शब्दायन, सुप्रिया देशपांडे यांचे टिपण. 'भाषा आणि जीवन', १९.४, दिवाळी २००१).

**(चार)** पंचतंत्रातील एका कथेत देवशर्मा म्हणतो, 'कुलशीलवान पुरुषाने स्मशानातील मडक्याप्रमाणे स्त्रियांना वर्ज्य मानावे.' (पंचतंत्र - १.४)

**(पाच)** या संदर्भात स्वतः चक्रधरांवर आलेला एक प्रसंग आहे. ते नाथोबाला तो सांगतात. एकदा एका ठाकुराकडे चक्रधर भिक्षा मागण्यासाठी गेले होते. ठाकुराची बायको न्हाऊन केस वाळवीत बसली होती. चक्रधरांना पाहून तिने आपल्या हातातील काकणांशी चाळा केला व दासीकरवी त्यांना विचारले, 'या देवांची देवी आहे ना? तिच्याशिवाय यांना कसे करमते?' तिचा अभिप्राय लक्षात येताच चक्रधर तेथून निघून गेले. (लीळाचरित्र - पूर्वार्ध-५६).

**(सहा)** मी येथे 'वारकऱ्यांचे' ज्ञानदेव असा उल्लेख जाणीवपूर्वकच केला आहे. कारण त्यांच्या सांप्रदायिक प्रतीतच उपरोक्त उपमान आहे. राजवाडे पाठात वेगळे उपमान येते ते असे -

जैसें थोर विष भूवंगीं । आंग सानें ॥ (राजवाडेपाठ अनुसरणारी मुंबई विद्यापीठ प्रत - १६.२५१) भावार्थ असा - भुजंगाचे शरीर छोटे; पण विष जालीम असते.

येथील विषयाचा संदर्भ व ज्ञानदेवांचे व्यक्तित्व लक्षात घेता हाच पाठ योग्य वाटतो.

मात्र अलीकडेच प्रकाशित झालेल्या श्री० रा०शं० नगरकरांच्या 'संत सुभाषित कोश' यामध्ये दांडेकर पाठ स्वीकारार्ह मानून मूळ लेखनातील स्त्रीचे उपमानच संग्रहीत केले आहे. (पृ० ३४१) ■

# सर्द हवा, सर्दी व शारदा

मो०गो० धडफळे

‘शारदा’ व ‘सरस्वती’ ही विद्यादेवीची दोन नावे आहेत. ज्ञान हे ‘अर्थपूर्ण वाणी’शी (Logosशी) संबद्ध असते. Logosपासून ‘logy’ हा शास्त्रदर्शक प्रत्यय तयार झाला आहे. उदाहरणार्थ, Psycho-logy, Socio-logy.

मुळात राजस्थानातील एका नदीचे नाव ‘सरस्वती’ हे होते. दामोदर धर्मानंद कोसंबी या संशोधकांच्या मताने सरस्वती नदी म्हणजे मुळातील अफगाणिस्थानातील हेल्मंड. काही वैदिक संशोधनाच्या मते ही भारतीय ‘सरस्वती’ प्राचीन काळी इराणमध्ये (जो देश ‘आर्याणाम्’ म्हणून ‘इराण’) ‘हरम्खैती’ म्हणून प्रसिद्ध होती.

‘सरस्’ किंवा ‘हरस्’ हा शब्द ‘सृ’ या धातूपासून आला आहे. ‘सृ’ या धातूचा मूळ अर्थ वाहणे. ‘वाहणे’ हा वाऱ्याचा व पाण्याचा धर्म आहे. ‘मेघदूता’त कालिदास म्हणतो ‘तं चेद् वायौ सरति...’ वायु वाहतो (सरतो) तसेच पाणी वाहते, सरते. थोडक्यात ‘सरस्-वती’ म्हणजे वेगाने पाणी वाहून नेणारी नदी. सरस् याचा अर्थ पुढे ‘सरोवर’ व ‘कालवा-नाला’ असा झाला. काश्मीरमध्ये असे खळाळून सतत वाहणारे ‘नहर’ होते. अशा नहरच्या काठी राहणारे काश्मिरी सारस्वत ब्राह्मण म्हणजे ‘नहरु’ (पुढे ‘नेहरु’).

योगायोग असा की ‘शारदा’ ही देवी देखील मूळची काश्मीरचीच. तिचा संबंध ‘शरद्’ ऋतूशी आहे. शरद ऋतूत आकाश स्वच्छ, निरभ्र असते. आकाशात टिपूर चांदणे पडलेले दिसते. पण पावसाळ्यानंतर येणाऱ्या या हिवाळी शरद ऋतूतच ऋतुसंधीमध्ये पडसं-खोकला (सर्दी जुकाम) असे आजार बळावतात. हवा ‘सर्द’ होते. ‘शारदा’, ‘सर्द’ हवा व ‘सर्दी’ यांचा याप्रमाणे परस्परांशी शब्दसंबंध आहे.

पालित्रिपिटकातील महावग्गाच्या भेसज्ज (भैषज्य) क्खन्धात (स्कन्धात) ‘सारादिक आबाध’ (autumnal disease)चा अनेकवार उल्लेख आढळतो.

वेदातील ‘शारद’ हा शब्द माझ्या कयासानुसार बाबिलोनो असीरिय (म्हणजे सध्याचा सिरिया देश) अशा शबातू (Sabatu) या शब्दापासून निपजला असावा. त्याचा मूळ अर्थ कोवळ्या धान्याचा हंगाम. नवीन मोसमातले तांदूळ वगैरे धान्य कच्चे, अपरिपक्व असते. ते ‘शारद’ असते. जेव्हा ऊन देऊन ते परिपक्व केले जाते त्या वेळी ते ‘शारदेतर’ होते. बुद्धी कच्ची असणारा म्हणूनच ‘शारद’ तर परिपक्व बुद्धीचा ‘वि-शारद’ (निष्णात,





अनुक्रमणिका

तरबेज) म्हणवला जातो.

'सरस्' हा मुळात 'जलौघ' पण उत्तम पट्टीच्या वक्त्यांची वाणी हीदेखील 'न अडखळणारी' (अ-स्खलित) असते. तिला आपण 'वागौघ' म्हणतो. या वागौघाशी, ज्ञानौघ (ज्ञानगंगा) संबद्ध होतो. अशा रीतीने 'वाहत्या नदीच्या प्रवाहापासून' 'वारि-सरस्वती'पासून 'वाक्सरस्वती' व 'ज्ञानसरस्वती' म्हणजेच विद्यादेवी असणारी सरस्वती देवी अवतरते. सरस्वती देवीच्या चित्रामध्येही ती 'हातात वीणा धारण करणारी' या स्वरूपात आपल्याला दिसते. ही प्राय: नदीकाठीच दाखविण्यात येते. ती पांढऱ्या कमळावर बसलेली असते (श्वेतपद्मासना). पाण्याचा रंगही स्वच्छ धवल असाच असतो. ती 'कुन्देन्दुतुषारहारधवला' व 'श्वेतवस्त्रावृता' असते.

भौगोलिक दृष्ट्या सरस्वती व तिच्यापेक्षाही विशेषकरून अधिक म्हणजे 'शारदा' हिचा संबंध काश्मीरशी आहे. काश्मीरात शारदामातेचे मंदिर आहे. शारदादेश किंवा शारदामण्डल म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जम्मू-काश्मीर भागातील लिपी 'शारदा-लिपी' म्हणून ओळखली जाते. आठव्या शतकापासूनच्या शारदेमागील बाबिलोनि-असीरियन सांस्कृतिक लागेबांधे अधिक स्पष्ट करण्यासाठी अधिक अभ्यास-संशोधन होणे गरजेचे आहे.

माझी तरी मजल आजपर्यंत अफगाणिस्तानातील 'सर्दा' नावाच्या कलिंगड, खरबुजाच्या कुळातील भूमिज फळाच्या नावापलीकडे जाऊ शकली नाही. अफगाणिस्तानातील या फळाला हे नाव पर्शु-इराणीतील 'सर्द' (अर्थ हिरवट-पिवळा असा कचा रंग) या शब्दावरून प्राप्त झालं आहे. सर्दी-पडसं हेही याच रंगाचं नसतं का?

कृ०पां० कुलकर्णी यांच्या व्युत्पत्तिकोशामध्ये मात्र अतिशय आश्चर्यकारकरीत्या 'शारदा' हा ज्ञानदेवी वाचक शब्द संस्कृतातील हिंसा (इजा) करणे या अर्थी असलेल्या 'शृ' या धातूपासून व्युत्पन्न झाल्याचे सांगितले आहे. 'शृ' धातूपासून संहारक शर (बाण) हा शब्द किंवा मारकशिंगे (शृङ्ग) हा शब्द तयार होणे हे मी समजू शकतो; पण 'शृ'पासून कोणत्या अर्थविकास प्रक्रियेने (socio-semantic development) ज्ञानदेवता वाचक शब्द तयार झाला; हे ग्रंथकर्त्याने सांगितले नाही. ते हयात असते तर मी त्यांना सुचवले असते की अज्ञान अथवा अज्ञानाच्या अंधाराचा 'नाश/संहार' करणारी देवता असा काहीसा तरी अर्थविकासक्रम सांगा. पण ''शशीशशिशुशी: (शिर्)'' हा संस्कृतसमान ठीक आहे. 'द्दा' या देणारी या अर्थाच्या स्त्रीप्रत्ययाचे काय? मग याही पुढे जाऊन 'शर (संहारक अस्त्र) देणारा तो 'शर-द' व या शरदाची अपत्य कन्या ती शारदा असे वृद्धियुक्त अपत्यनाम (शरदस्य अपत्यं स्त्री) शारदा एवढा प्रवास करावा लागेल. मेयर हॉफर सारखा जर्मन-संस्कृत पंडित यावर टिप्पणी करताना म्हणणारच 'unklar'. ■

# मर्ढेकरांच्या कवितांची शैलीशास्त्रीय समीक्षा

नीलिमा गुंडी

[परीक्षित पुस्तक : 'मर्ढेकरांची काव्यशैली', डॉ० सुरेश भृगुवार. कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे. २०११, पृष्ठे २१४. किंमत ₹ २००/-]

नवकाव्याचे प्रवर्तक ठरलेल्या बा०सी० मर्ढेकर यांची कविता साठ वर्षे होऊन गेली तरी आजही समीक्षकांना आव्हान देत आहे. मर्ढेकरांच्या कवितेची आजवर झालेली समीक्षा लक्षात घेतली तर त्यात समीक्षेच्या विविधप्रकार-विशेषांचा समावेश दिसतो. चरित्रात्मक, मानसशास्त्रीय, मार्क्सवादी, आस्वादक आदी विभिन्न प्रवृत्तींच्या समीक्षापद्धती त्यांच्या काव्याच्या आकलनासाठी उपयोगात आणल्या गेल्या आहेत. मर्ढेकरांची कविता दुर्बोध ठरली, हे जसे त्यामागचे एक कारण होते, तसेच ती विलक्षण प्रभावी आणि नवप्रवाह निर्माण करण्याची क्षमता असलेली होती; हेही एक कारण आहे. त्यामुळे डॉ० सुरेश भृगुवारांना मर्ढेकरांच्या बारा कवितांची शैलीशास्त्रीय समीक्षा करावीशी वाटली, हे साहजिक ठरते.

डॉ० भृगुवार यांनी यापूर्वी गोविंदाग्रजांच्या काव्यशैलीचा अभ्यास केला असून ते कुसुमाग्रजांच्या काही कवितांचाही या दृष्टिकोनातून अभ्यास करीत आहेत. प्रस्तुत पुस्तकात त्यांनी सुरुवातीला 'मर्ढेकरांची काव्यशैली' हे प्रकरण लिहिले असून त्यात स्वत:ची शैलीविश्लेषणाची तत्त्वे (त्यांच्या भाषेत, 'शैलीउपाय') सांगितली आहेत. त्यात 'शब्दप्रधान शैलीउपाय', 'रचनाप्रधान शैलीउपाय' आणि 'अर्थप्रधान शैलीउपाय' या मुख्य प्रकारांतर्गत सोळा प्रमुख शैलीउपाय व सतरा पोटभेद मिळून तेहतीस शैलीउपाय असल्याचे ते नोंदवतात. मात्र ज्या उपायांची उदाहरणे मर्ढेकरांच्या कवितेत वैपुल्याने आढळली त्यांचीच ओळख पहिल्या प्रकरणात समाविष्ट आहे. त्यामुळे येथील तात्त्विक बैठक अपुरी राहते. उदाहरणार्थ 'शब्दप्रधान शैलीउपाय' यात ते (१) आवृत्ती (२) शब्दविवेक (३) समानार्थक शब्द (४) नवनिर्मित शब्द व (५) नकार असे पाच उपाय नोंदवतात. यात ते 'समानार्थक शब्द' स्वतंत्रपणे का नोंदवत आहेत? 'नकार' यात त्यांना काय अभिप्रेत आहे? 'शब्दविवेक'मध्ये यांचा समावेश होऊ शकत नाही का?- असे प्रश्न पडतात. तसेच 'रचनाप्रधान शैलीउपाया'त ते 'उत्तरगर्भ प्रश्न' हा उपप्रकार वेगळा का मानत आहेत? 'विरामचिन्हे' या उपप्रकारातच तो समाविष्ट नाही का?

'मानुषीकरण' याचा समावेश 'अलंकार' या प्रकारात का होत नाही? असे प्रश्न पडतात. त्यांनी सुरुवातीला आपल्या समीक्षेची तात्त्विक बैठक परिपूर्णपणे सादर करणे योग्य ठरले असते.

भृगुवारांनी मर्ढेकरांच्या बारा कविता निवडल्या आहेत. त्यांच्यामते या सर्वाधिक शैलीसंपन्न कविता आहेत. या कविता महत्त्वाच्या आहेत, यात शंका नाही. यात 'काळ्या बंबाळ अंधारी', 'गणपत वाणी', 'फुटेल (होती वेडी आशा)', 'पोरसवदा होतीस', 'भटकत फिरलो भणंग आणिक', 'झोपलीं ग खुळीं बाळें', 'आला आषाढ श्रावण', 'ह्या गंगेमधिं गगन वितळलें', 'न्हालेल्या जणु-गर्भवतीच्या' 'दंवात आलिस भल्या पहाटीं', आणि 'अभ्रांच्या ये कुंद अफूनें' आणि 'अस्थाईवर स्थायिक झालो' या कविता निवडल्या आहेत. शेवटी 'निष्कर्ष व समारोप' असे प्रकरण आहे. बारा कवितांवर स्वतंत्र लेख असून त्यात मूळ कविताही उद्धृत केली आहे, हे वाचकांच्या दृष्टीने सोयीचे झाले आहे.

भृगुवार प्रत्येक कवितेचे शैलीविश्लेषण करताना त्यातील शैलीउपायांची बारकाईने नोंद करतात. शब्दविवेक, क्रमविपर्यय, संदर्भोल्लेख, विचलन, अलंकार, विरामचिन्हे, कवितेची मांडणी इत्यादी बाबींचे काव्यदृष्ट्या मर्म उलगडण्याचा अधिकाधिक प्रयत्न करतात. त्यामुळे मर्ढेकरांच्या कवितांमधील काही जागांचे सौंदर्य नव्याने जाणवते तर काही दुर्बोध वाटणाऱ्या जागा नव्याने कळतात; याविषयीचे समाधान नोंदवायला हवे. उदाहरणार्थ 'बाळगुनी हा पोटी इवला' या ओळीच्या रचनेत ८-८ मात्रांचे दोन तुकडे कसे येतात, त्याची ते मांडणी करून दाखवतात आणि मर्ढेकरांना छंद:शास्त्रातील मात्रांचेच नव्हे, तर संगीतातील ठेका व तालांचेही ज्ञान चांगले असावे, हे लक्षात आणून देतात. 'फुटेल (होती वेडी आशा)' या कवितेत ते निवेदनाचा ओघस्वर कधी चढता (आरोही) तर कधी उतरता (अवरोही) आहे, याकडे लक्ष पुरवतात. 'अम्हांस आम्हीं पुन्हा पहावें' या ओळीत 'पुन्हा' या क्रियाविशेषणातून स्वत:ला 'ज्ञानचक्षूंनी' बघणे कवीला अपेक्षित आहे; हे सांगतात. 'ह्या गंगेमधिं गगन वितळलें'मधील 'ह्या' या शब्दाचा वापर सार्वनामिक विशेषणासारखा केला आहे, असे सांगून सूचितार्थाकडे रसिकांचे लक्ष वळवतात. गगन 'वितळलें' यामध्ये अर्थाची मेख नेमकी काय आहे, याचा खोलात जाऊन वेध घेतात. त्यांची चिकित्सापद्धती सौंदर्यग्राहक वृत्तीची आहे.

भृगुवारांच्या, शोधक आणि मार्मिक वृत्तीचा ठसाही त्यांच्या विवेचनात सर्वत्र उमटलेला आहे. 'झोपलीं ग खुळीं बाळें'मधील नक्षत्रनामांची चर्चा, 'खुजा तारा' याची चर्चा 'अस्थाईवर स्थानिक झालो'मधील सांगितिक प्रतिमांची चर्चा तसेच 'धपापते हे इंजिन'मधील वाफेच्या इंजिनाची माहिती आदी लेखन विशेष उल्लेखनीय आहे.

मर्ढेकरांच्या काव्यशैलीविषयीचे भृगुवारांचे भाष्य शेवटी आले आहे. त्यात ते

लिहितात की आवृत्ती, क्रमविपर्यय, विशेषणे व संदर्भ-विचलने ह्या शैलीउपायांकडे मर्ढेकरांचा अधिक कल आहे. मर्ढेकर परिचित विशेषण-विशेष्यांच्या अपरिचित जोड्या निर्माण करून नवीनीकरण साधतात. परभाषेतील शब्दांना मराठी वळण देतात. 'संदर्भ-विचलन' हा शैलीउपाय ही मर्ढेकरांनी शैलीउपायांच्या संख्येत घातलेली मौलिक भर आहे. 'संदर्भ विचलन' म्हणजे 'विडंबन' किंवा 'विरूपीकरण' नव्हे; हे भृगुवारांचे म्हणणे विचारात घेण्याजोगे आहे. त्यांनी तयार केलेल्या काही पारिभाषिक समीक्षा-संज्ञाही अर्थपूर्ण आहेत.

या पुस्तकातील विवेचन वाचताना काही मर्यादाही जाणवतात. त्या मुख्यत: शैलीविश्लेषण पद्धतीच्या मर्यादा आहेत आणि काही भृगुवारांच्या समीक्षाशैलीच्याही मर्यादा आहेत. शैलीविज्ञानाचे उपयोजन करून लिहिलेली समीक्षा ही 'रूपवादी' समीक्षा ठरते. ही समीक्षा कवितेतील बारकावे उलगडून दाखवण्यात मदत करते. पण कवितेतील गर्भित आशयाचे रहस्य तिच्या पदरी पडतेच, असे नाही. अर्थात भृगुवारही कवितेचे आकलन करून घेण्याचा हा एक मार्ग (एकमेव नव्हे!) आहे, अशी नेमस्त भूमिका घेतात. ती योग्यच आहे. कारण शैलीविज्ञानाचे उपयोजन करून पाहण्याची पद्धती काही वेळा यांत्रिक वाटू शकते. भृगुवार शैलीविज्ञानाचा वापर करून 'आस्वादक' पद्धतीने समीक्षा करतात. त्यांची समीक्षाशैली शब्दांचा सढळ वापर करणारी (उदा० 'मर्ढेकरांचे कविमन हादरते, थरथरते, व्यथित होते' पृ० २३) आहे. 'शैलीविज्ञान' यात 'विज्ञान' म्हणताना शब्दनिवडीमध्ये जे नेमकेपणाचे भान राखायला हवे, ते या आस्वादक शैलीत राखले जात नाही, हेही खटकते. ते शैलीशास्त्र आणि शैलीविज्ञान अशा दोनही संज्ञा एकाच अर्थाने वापरतात. मुख्य म्हणजे मर्ढेकरांच्या कवितांमधील सामाजिक आशयदृष्ट्या अतिशय प्रभावी असे युद्धकालीन अभंग यात समाविष्ट केलेले नाहीत. त्यांचेही शैलीविश्लेषण करण्याचे आव्हान भृगुवारांनी स्वीकारायला हवे.

अशा काही मर्यादा असल्या तरी या पुस्तकाचे महत्त्वही लक्षात घ्यायला पाहिजे. साठोत्तरी मराठी समीक्षेत रूपवादी समीक्षा क्षीण होत गेली आहे. अशा वेळी कवितेवरच लक्ष केंद्रित करून केलेली ही समीक्षा 'काव्य' या वाङ्मयप्रकाराची अंतर्गत ताकद लक्षात आणून देण्यासाठी उपयुक्त ठरते. दुसरे म्हणजे मर्ढेकर हे भाषेविषयीचे संवेदन विलक्षण तीव्र आणि उत्कट असलेले कवी होते. त्यामुळे त्यांच्या कवितांचा शैलीविश्लेषणाच्या अंगाने अभ्यास करणे योग्य व आवश्यकच आहे. या पार्श्वभूमीवर भृगुवारांचा हा सखोल व्यासंगावर आधारित प्रयत्न स्वागतार्ह आहे. डॉ० कल्याण काळे यांची प्रस्तावनाही शैलीवैज्ञानिक समीक्षेची वैशिष्ट्ये नेमकेपणाने उलगडून दाखवणारी म्हणून महत्त्वाची आहे. एकंदरीत जिज्ञासू वाचक व अभ्यासक यांना हे पुस्तक उपयुक्त आहे.

■



अनुक्रमणिका

# मूलाँ रुज : शापित प्रतिभावंताची दास्तान

सुहास भास्कर जोशी

[परीक्षित पुस्तक : 'मूलाँ रुज', मूळ लेखक पीअर ल मूर, स्वैर रूपांतर श्री० जयंत गुणे. प्रकाशक लोकवाङ्मय गृह, मुंबई. पृष्ठे ३२४. किंमत ₹ ३००/-]

कलाप्रेमी रसिक वाचकांच्या विश्वात चित्रकारांच्या जीवनावर आधारित ज्या काही इंग्रजी कादंबऱ्या विशेष लोकप्रिय आहेत, त्यामध्ये व्हिसेंट व्हॅन गॉगच्या जीवनावरील 'लस्ट फॉर लाईफ', मायकेलेंजेलोच्या आयुष्यावर आधारित 'ॲगनी अँड एक्स्टसी', पॉल गोगँच्या आयुष्यावर बेतलेली 'मून अँड सिक्स पेन्स'चा समावेश केला जातो. या पुस्तकांच्या यादीत पिएर लामूर यांनी लिहिलेल्या हेन्री तुळूज लोत्रेक याच्या आयुष्यावर आधारित कादंबरीचा - 'मूलाँ रुज'चा उल्लेख अपरिहार्य आहे. त्यामुळे 'मूलाँ रुज' या कादंबरीचे अत्यंत सुरस असे स्वैर रूपांतर सादर केल्याबद्दल श्री० जयंत गुणे आणि अतिशय देखण्या स्वरूपात ती प्रकाशित केल्याबद्दल लोकवाङ्मय गृह प्रकाशन संस्था अभिनंदनास पात्र आहेत.

नियतीचा खेळ मोठा विचित्र असतो. एकीकडे ती न मागता काही जणांच्या ओंजळीत प्रतिष्ठा, पैसा, प्रतिभा अशा अनेक अप्राप्य गोष्टींचे भरभरून दान देते. मात्र त्याच वेळी प्रेम, लग्न, बायको-मुलं अशा साध्या-सुध्या गोष्टी काही जणांच्या बाबतीत दिवास्वप्नं म्हणून राखून ठेवते. नियतीच्या या विलक्षण खेळाचा विषय बनलेल्या शापित प्रतिभावंतांचं - हेन्री लोत्रेकचं, डोळ्यांच्या कडा ओल्या करणारं चित्र 'मूलाँ रुज' या कादंबरीत रंगवलेलं आहे. व्हॅन गॉग, पॉल गोगँ, एडगर दगा या श्रेष्ठ चित्रकारांना समकालीन असणाऱ्या लोत्रेक (१८६४-१९०१) या कलाकाराचं कलेच्या इतिहासात एक स्वतंत्र स्थान आहे. या शापित प्रतिभावंताची ओळख करून देणारी ही कादंबरी - 'मूलाँ रुज'.

कादंबरीची सुरवात होते ती 'रीरी' (हेन्रीचं टोपणनाव) त्याच्या लाडक्या आईचं चित्र काढत असतो, त्या प्रसंगापासून. (आईचं प्रेम हा हेन्रीच्या शापित आयुष्यातला एक मधुर उःशाप असतो.) आपल्या उमराव घराण्याची प्रतिष्ठा सांभाळण्यात आणि जंगली श्वापदांची शिकार करण्यात धन्यता मानणाऱ्या हेन्रीच्या वडिलांचं आणि हेन्रीचं मात्र कधीच पटलं नाही. 'लिट्ल ज्वेल' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या हेन्रीला वयाच्या

आठव्या वर्षी पायावर लागोपाठ दोन आघात होतात. जबरदस्त अशा या अपघातांमुळे हेन्रीच्या पायांची वाढ खुंटते. कमरेपासून वर वाढलेल्या बोजड शरीराचा भार पेलायला हाताशी काठी येते. मात्र चित्रकलेची जबरदस्त आवड त्याला पॅरिसला खेचून आणते. औपचारिक कलेच्या शिक्षणानंतर तो जोमानं चित्रं काढायला लागतो. मित्र मिळतात. कलंदर लोत्रेक कुंटणखान्यात राहून वेश्यांची पेंटिंग काढायला लागतो. तिथल्या नृत्यालयासाठी पोस्टर्स बनवतो. आघाडीचा चित्रकार म्हणून पॅरिसमध्ये त्याला पैसा, प्रसिद्धी, नावलौकिक मिळतो. परंतु त्याच्या आयुष्यात आलेल्या डेनिस, मारी, मिरीयम या तिन्ही स्त्रिया त्याच्या व्यंगाची हेटाळणी करून त्याला झिडकारतात. पैशाच्या जोरावर तो वेश्यांकडून शरीरसुख मिळवतो; पण लग्न, बायको-मुलं या गोष्टी मात्र त्याला मिळत नाहीत. अखंड केलेल्या मद्यपानामुळं त्याच्या शरीराची वाताहत होते. भ्रम झालेल्या हेन्रीला मनोरुग्णालयात ठेवतात. अखेर वयाच्या अवघ्या सदतिसाव्या वर्षी त्याचा अंत होतो.

१९५० साली पिएर लामूर यांनी (रँडम हाऊस पब्लिशर्सनी सुरुवातीला अनवधानानं यांचं नाव 'पिएर ल मूर' असं छापलं आणि नंतर तेच रूढ झालं!) 'मूलाँ रुज' ही कादंबरी लिहिली आणि ती जबरदस्त लोकप्रिय झाली. पुढं या कादंबरीवर चित्रपट काढला गेला, त्याला दोन ऑस्कर अ‍ॅवॉर्ड्सही मिळाले. 'बियाँड डिझायर', 'प्रायव्हेट लाईफ ऑफ मोनालिसा' अशी इतर पुस्तकं जरी पिएर लामूर यांनी लिहिली असली, तरी त्यांना खरी लोकप्रियता मिळाली ती या 'मूलाँ रुज' कादंबरीमुळेच.

पिएर लामूर यांची मूळ कादंबरी ही प्रदीर्घ आणि काहीशी पाल्हाळिक आहे. जयंत गुणे यांनी या कादंबरीचा अनुवाद किंवा भाषांतर न करता स्वैर रूपांतर केले आहे. गुण्यांचं भाषाप्रभुत्व आणि संपादन कौशल्य यामुळे या रूपांतराला एक छानसा प्रवाहीपणा आणि चटपटीतपणा आला आहे. मात्र असं स्वैर रूपांतर करताना काही वेळा मूळ कादंबरीतले संवाद अगदी थोडक्यात सारांशरूपात (उदाहरणार्थ, पहिल्या प्रकरणातील हेन्री व त्याचे वडील यांच्यातील संवाद) येतात, तर काही वेळा काही गोष्टी गाळल्यामुळे वाचकांना काही संदर्भ लागत नाहीत. (उदाहरणार्थ, सुरुवातीला आई हेन्रीला म्हणते - ''पॅरिसमध्ये आपल्याबरोबर जोसेफ आणि ऑनेत पण आहेत की..'' मात्र गुणे यांनी ऑनेत या हेन्रीच्या दाईची माहिती आधी न दिल्यामुळे वाचक बुचकळ्यात पडू शकतो.) मूळ कादंबरीत फ्रेंच शब्द खूप आहेत. श्री० गुणे यांनी परिश्रमपूर्वक त्यांना सुयोग्य मराठी प्रतिशब्द वापरले आहेत. मात्र चित्रकार, कलावंत यांच्या नावांच्या उच्चाराबाबत संभ्रम निर्माण होतात. मराठीत प्रचलित असणाऱ्या चित्रकार सरा, दगा, संगीतकार बाख यांच्याऐवजी गुणे यांनी सोरा, देगा, असे उच्चार दिले आहेत.

श्री० गुणे यांच्या पुस्तकाबाबत विशेष आनंदाची गोष्ट म्हणजे लोत्रेकची आठ रंगीत

पेंटिंग्ज/पोस्टर्स अत्यंत उत्कृष्टरीत्या आर्टपेपरवर छापलेली आहेत. ही चित्रं बघून वाचकांच्या मनात लोत्रेकविषयी अधिक जाणून घ्यावं, त्याची चित्रं पाहावीत अशी इच्छा नक्की निर्माण होईल. (मात्र पुस्तकातील पान क्र० २१वर छापलेल्या रंगीत चित्राची माहिती देताना तपशिलात मूलभूत चूक झाली आहे. पान क्र० २२वर असं म्हटलं आहे : 'चित्रात दाखवलेल्या व्यक्ती ओळखता येतात. लोत्रेक मध्यभागी बसला आहे...' वस्तुतः लोत्रेक बसलेल्या माणसांच्या पार्श्वभूमीवर आपला उंच चुलतभाऊ गॅब्रिएल याच्याबरोबर चालताना दाखवला आहे. गुण्यांना जी बसलेली व्यक्ती लोत्रेक वाटते आहे, ती लोत्रेक नसून ती शॅंपेन विक्रेता मॉरिस गिल्बर्ट आहे.)

श्री० गुण्यांबाबत शेवटी असं म्हणावंसं वाटतं की त्यांच्या मनात मुळात चित्रकलेविषयी प्रेम आहे. मराठी भाषेवर प्रभुत्व आहे. चांगल्या इंग्रजी साहित्याची जाण आहे. भविष्यकाळात त्यांच्याकडून उत्तम इंग्रजी कादंबऱ्यांच्या स्वैर रूपांतराचीच नव्हे; तर स्वतंत्र पुस्तकाचीच अपेक्षा आहे. ■

## मराठीचे अध्ययन

आपण पहिलीपासून दहावीपर्यंत मराठीचा आग्रह धरलेला आहे. अकरावीपासून मराठी विषय सोडला तरी चालेल, अशी व्यवस्था केलेली आहे. हे योग्य नाही. लोकांनी ते रोखायला हवे आहे. कुठलेही विषय घ्या, पण एक विषय मराठी हा असलाच पाहिजे, असा लोकांनी आग्रह धरायला पाहिजे, आणि शासनानेही विचार करायला पाहिजे. जी मुले अकरावी-बारावीला मराठी विषय घेतात त्यातली काही बीएला जातात आणि मराठी साहित्य हा विषय घेतात. बी०एस्सी० बी०कॉम०कडे जाणाऱ्यांना मराठी साहित्य हा विषय घेण्याची संधीच आपण नाकारलेली आहे. अभियांत्रिकी, तंत्रज्ञान, वैद्यकविद्या, व्यवस्थापनविद्या यांच्याकडे बहुसंख्य विद्यार्थी जातात. त्यांच्या अभ्यासात भाषा नाही आणि साहित्यही नाही. म्हणजे मराठी वाचवण्याची सगळी जबाबदारी बी०ए०ला जाणाऱ्या मूठभर विद्यार्थ्यांच्या डोक्यावर आपण टाकलेली आहे, ही वस्तुस्थिती आहे. काही थोडे लोक मराठीचे अध्ययन करतात. बाकीच्यांना मराठीशी काही देणे-घेणे नाही. ही वस्तुस्थिती भाषेच्या, साहित्याच्या, संस्कृतीच्या आणि त्या विद्यार्थ्यांच्या जीवनाच्याही दृष्टीने चांगली नाही. भाषेपासून, साहित्यापासून मुलांना तोडून टाकता आणि मराठी भाषेचे काय होईल, मराठी साहित्याचे काय होईल अशी चिंता करता, ही विसंगती आहे. मी असे सुचवतो आहे की, आपण अन्य विद्याशाखांमध्येही साहित्य हा विषय ठेवावा. भाषा निवडण्याचा विकल्प मुलांना द्या. मराठी, हिंदी, इंग्रजी, गुजराती, इतर कोणतीही भारतीय भाषा. मूळ भाषेतले साहित्य, अनुवादित साहित्य त्यांना देता येईल. मुलांना साहित्यापासून अजिबात तोडू नये.

[ वसंत आबाजी डहाके, 'लोकसत्ता', दि० ४ फेब्रुवारी २०१२ ]

पुस्तक-परीक्षण

# विषय अवघड, पण भाषा आणि मांडणी सोपी

मनोहर राईलकर

[परीक्षित पुस्तक : 'गणितातील रम्य प्रमाण', लेखक डॉ० सदाशिव देव. प्रकाशक वाई तालुका गणित अध्यापक मंडळ, वाई.]

अलीकडे शिक्षकांची भाषा फारच औपचारिक आणि काटेकोर होऊ लागली आहे, असं दिसून येत आहे. त्यामुळे भाषा कठीणही होत आहे. गणित अचूक हवं हे मान्य केलं तरी त्यासाठी भाषासुद्धा अगदी अचूक हवी असं नव्हे. एरवीही आपण दैनंदिन जीवनात मोघमच भाषा वापरतो. चपलेत पाय घालीत असलो तरी म्हणतो, पायात चप्पल घातली. त्यावर शिक्षक आक्षेप घेतात; पण गणित हे दैनंदिन जीवनापेक्षा काही तरी भयंकर आहे, अशी समजूत शिक्षकांच्या असल्या काटेकोर भाषेच्या आग्रहामुळंच झाली आहे आणि होतही आहे. गणिताची भीती मुलांना वाटते, त्यामागं शिक्षकांचा अचूक भाषेचा अत्याग्रह हे एक आहे. गणिताच्या तर्कशुद्धतेला धक्का न लावता मोघम भाषेत लिहिलेली पुस्तकं इंग्रजीत आहेत. तशी मराठीत का लिहू नयेत? त्यामुळंच डॉ० देवांचा प्रयत्न मला स्वागतार्ह वाटतो.

ही प्रस्तावना अशाकरिता केली की, आपल्याकडील मोठ्या गणितज्ञांना खालच्या पातळीवर उतरून गणितावर काही साधं सोपं लिहायला मी सांगितलं तेव्हा बहुतेक वेळा नकारच ऐकून घ्यावा लागला. काहीजण प्रयत्न करतात. तरीपण मुलांना कसं सांगितलं की समजतं, हे त्यांना जमल्याचं क्वचितच आढळलं. अर्थात, हा माझा अनुभव आहे, त्यामुळं डॉ० देवांचं हे पुस्तक वाचताना मला एक आश्चर्याचा धक्काच बसला. कारण, डॉ० देव हे मोठेच गणिती आहेत. परदेशातही त्यांनी अध्यापन केलं आहे.

रम्य प्रमाण हा गणित्यांच्या आवडीचा एक विषय. इंग्रजीत त्याला Golden Ratio म्हणतात. ह्या प्रमाणाचे किंवा गुणोत्तराचे म्हणा, गणितात इतके विविध आविष्कार पाहायला मिळतात की वाचणाऱ्यानं थक्क व्हावं. आणखी विशेष म्हणजे आपल्याला कल्पनाही येणार नाही, इतक्या विविध रूपांत तो आपल्याला निसर्गातही आढळून येतो. झाडांच्या फांद्या, शंखातील पीळ, प्रत्येक पिढीबरोबर वाढणारी प्राण्यांची संख्या, इत्यादी. त्यांचंही दर्शन डॉ० देव यांनी आपल्याला घडवलं आहे. सर्वसामान्य व्यक्तीलाही नकळत रम्य प्रमाणाचं कसं आकर्षण असतं, त्यावरही डॉ० देव प्रकाश टाकतात. निसर्गातील

रम्य प्रमाण हा तर मुद्दा आहेच. पण गणिताच्या विविध शाखांतही अचानकपणं रम्य प्रमाण, असं काही दर्शन देऊन जातं की आश्चर्यच वाटावं.

पुष्कळदा बाह्यतः भिन्न वाटणाऱ्या गणिताच्या वेगवेगळ्या शाखांखालून सुप्तपणं एकच अंत:प्रवाह वाहत असतो. त्याचा शोध काहीसा अवघड असतो. अशा अवघड वाटणाऱ्या विषयावर डॉ० देवांनी लिहिलेलं हे पुस्तक आपण सहज वाचू लागतो. अर्थात, त्याकरता काही मूलभूत गणिताच्या ज्ञानाची आवश्यकता आहे, हे मी नाकारीत नाही. पण, काही थोडे अवघड टप्पे सोडले तर, आठवीचं गणित येत असलेल्या कुणाही विद्यार्थ्याला हे पुस्तक सहज वाचता येईल, असं मला वाटतं.

पुस्तक परीक्षणातील विषयांबद्दल वाचता वाचता परिचय मुलांना होईलच. तरीही हे गणितावरील पुस्तक आहे, हे विसरून चालणार नाही. ठिकठिकाणी दाखवलेल्या आकडेमोडी वाचल्यावर, त्या स्वत:ही करून पाहणं अत्यावश्यक आहे. त्याशिवाय विषयाचं यथार्थ आकलन होणार नाही.

मला जाणवलेला मुद्दा मी पुन्हा एकदा मांडू इच्छितो. मोठे गणिती इतक्या सोप्या भाषेत लिहू शकतात, ह्याचं ह्या निमित्तानं मला दर्शन झालं, ही बाब महत्त्वाची आहे.

ज्यांना शक्य आहे, त्या पालकांनी आपल्या मुलांना हे पुस्तक घेऊन द्यावंच. पण शाळांनीही आपल्या ग्रंथालयात ह्या पुस्तकाच्या प्रती घेऊन त्या मुलांना वाचायला व त्यातील विषयावर बोलायला सांगावं, असं मी ह्या निमित्तानं सुचवू इच्छितो. कारण त्यातूनच मुलांना गणिताचा अभ्यास स्वत:च करायची आणि त्यावर बोलायची सवय लागेल आणि त्यांना आत्मविश्वास वाढेल. ■

## वाचावे असे काही...

(१) 'अनुवाद संस्कृतीतून भारतीय साहित्याची संकल्पना तयार होत आहे', निशिकांत ठकार, 'पंचधारा', ऑक्टोबर-डिसेंबर, २०१०, पृ० ५०-६४

(२) 'मराठी भाषेचे संवर्धित भवितव्य : काही दिशा', आशुतोष पाटील, 'नवभारत', जानेवारी २०१२, पृ० ३४-३

(३) 'मायबोलीचे प्रेम म्हणजे अन्य भाषांचा द्वेष नव्हे', सलील कुळकर्णी, 'अंतर्नाद', फेब्रुवारी २०१२, पृ० ३१-३६

(४) 'ज्ञान आणि knowledge (एक पूर्श्चात्त्य योग)', सत्त्वशीला सामंत, 'मुक्त शब्द', जानेवारी २०१२, पृ० ५९-६३.



अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# भाषाविषयक मर्मदृष्टी देणारा ग्रंथ

विनायक गंधे

[परीक्षित पुस्तक : 'लिहावे नेटके' भाग १ व २ + उत्तर पुस्तिका, माधुरी पुरंदरे. ज्योत्स्ना प्रकाशन, पुणे. पृष्ठे ६०४+८०. किंमत ₹ ४००/-]

'लिहावे नेटके'च्या पहिल्या खंडात लेखिकेने वर्णमाला, अनुस्वार, क्रियापद, कर्ता, कर्म, सर्वनाम, वर्तमानकाळ, भूत, भविष्य, मुद्रितशोधन, आज्ञार्थ, ल्यबन्त आणि विभक्तिप्रत्यय या विषयांचा सविस्तर विचार केला आहे, तर दुसऱ्या खंडात विशेषण, क्रियाविशेषण, समानार्थी, समोचारी, उपसर्ग, लेखनसंवादभाषा, प्रश्न आणि उत्तर संभाषण, वाक्यरचना, वाक्प्रचार, उभयान्वयी अव्यय, विरामचिन्हे, परिच्छेद, तुलना, शब्दक्षेत्र या विषयांचा परामर्श घेतला आहे.

लेखिकेने आपल्या या बृहतप्रकल्पाच्या प्रस्तावनेत म्हटले आहे की, वाचन, लेखन, वक्तृत्व व एकूण अभिव्यक्ती सुधारणे हा प्रस्तुत लेखनाचा उद्देश आहे. भाषेला मानवी जीवनात अनन्यसाधारण स्थान आहे, हे लक्षात घेऊन नेमके, काटेकोर, अर्थपूर्ण बोलता आणि लिहिता यावे या हेतूने लेखिकेने या ग्रंथात भाषेचे नमुने दिले आहेत.

रूढ मराठी व्याकरणांच्या पुस्तकांपेक्षा या पुस्तकाचे प्रथमदर्शनी जाणवणारे वैशिष्ट्य म्हणजे ते रूक्ष, नीरस भाषेत व्याकरणाचे नियम सांगत नाही. उदा० 'वर्णमाला' या प्रकरणात ऱ्हस्व आणि दीर्घ अक्षरे यांच्या संदर्भातील हा नियम पाहा. शेवटच्या अक्षरात काही कारणाने कोणत्याही प्रकारचा बदल झाला - म्हणजे स्वर मिसळून त्याला काना, मात्रा, वेलांटी वगैरे लागले, त्याचे जोडाक्षर झाले किंवा एखादा शब्द किंवा अक्षर त्याच्यापुढे जोडले गेले तर आधीचे दीर्घ अक्षर रुसल्याप्रमाणे तोंड फिरवते आणि ऱ्हस्व होऊन बसते. (पृ० १३).

या ग्रंथात तृतीयपुरुषी निवेदन नाही. आहे तो संवाद. 'तू'शी अत्यंत उत्साहाने आणि खेळीमेळीने केलेला संवाद आहे. हा 'तू' म्हणजे सहावी-सातवीत असलेला विद्यार्थी आहे. या विद्यार्थ्याचे भावविश्व लक्षात घेऊन त्याची बौद्धिक क्षमता लक्षात घेऊन, त्याच्याशी मारलेल्या या भाषाविषयक व व्याकरणविषयक गप्पा आहेत. या गप्पांत शास्त्रीय पुस्तकातील कोरडेपणाचा लवलेशही नाही.

या ग्रंथात मराठी व्याकरणाच्या पुस्तकात हमखास आढळणारी पारंपरिक उदाहरणे

नाहीत. उदा० '''रामाने रावणास मारले' हे वाक्य प्रयोग-विचारात आपण कित्येक वर्षे वाचत आलो.'' अशा अतिपरिचित आणि त्याच त्याच उदाहरणांपेक्षा मुलांना भावणारी आधुनिक जगातील नवी उदाहरणे लेखिकेने घेतली आहेत. या उदाहरणांना भूतकाळापेक्षा चालू घडीचा म्हणजे वर्तमानाचा संदर्भ आहे. पौगंडावस्थेतील मुलांचे भावविश्व लक्षात घेऊन लेखिकेने समर्पक उदाहरणे दिली आहेत. आपल्या आजूबाजूच्या जीवनाचे संदर्भ दिल्यामुळे मुलांना ते आकर्षक वाटतील, यात शंका नाही. उदाहरण म्हणून क्रियाविशेषण या प्रकरणाची सुरुवात पाहण्यासारखी आहे. भल्या पहाटे विविध औषधी रस विकणाऱ्या बापलेकांचे मुलाच्या दृष्टीतून केलेले अतिशय हृद्य चित्रण आहे. यात फिरायला आलेले लोक व या मुलाचे वडील यांच्या संवादातून, लेखिकेने क्रियाविशेषणांचा परिचय करून दिला आहे.

मराठी व्याकरणात खरे तर अजूनही काही अनुत्तरित समस्या आहेत; पण लेखिकेने त्यातील विवाद्य किंवा मतभेदाचे विषय टाळले आहेत. कारण मूलतः हा ग्रंथ नव्याने भाषा व व्याकरण शिकणाऱ्यांसाठी आहे. प्रस्तुत ग्रंथात सहज होणाऱ्या भाषिक व्यवहाराची सुगम चर्चा केली आहे. वर्णमाला, शब्दांच्या जाती, काळ, वाक्यरचना या व्याकरणातील महत्त्वाच्या घटकांची लेखिकेने सविस्तर चर्चा केली असली तरी लेखिकेने या घटकांचा व्याकरणातील क्रम पाळलेला नाही. लेखिकेने त्या त्या विषयांच्या महत्त्वानुसार, भाषेतील वापरानुसार त्यांचा क्रम लावला आहे.

या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडात प्रामुख्याने भाषाविषयक विचारांचा परामर्श घेतला आहे. उदा० लेखनसंवाद भाषा, समानार्थी व समोच्चारी शब्द, संभाषण, परिच्छेद, तुलना, शब्दक्षेत्र इत्यादी. 'काळ' ही संकल्पना लेखिकेने विस्ताराने मांडली आहे. जवळजवळ शंभर पृष्ठे त्यासाठी खर्च केली आहेत. या प्रकरणात भूतकाळाचे विवेचन करताना काही घटना मधले काही दुवे सोडून वर्णन केल्या आहेत. विद्यार्थ्यांनी हे मधले दुवे आपल्या कल्पनाशक्तीने भरून काढावेत, अशी अपेक्षा आहे.

भाषेत आज्ञार्थाचा वापर मोठ्या प्रमाणात होतो. हे लक्षात घेऊन आज्ञार्थाचे विवेचन करताना लेखिकेने व्यावहारिक मराठीचे सुंदर नमुने सादर केले आहेत. उदाहरणार्थ, निरोप लिहिणे हा उपविषय घेऊन त्याची विविध उदाहरणे दिली आहेत. आपल्यापेक्षा लहानांना, मित्राला, ज्येष्ठ आदरणीय व्यक्तीला निरोप लिहिताना कोणती व कशी भाषा वापरावी याचे हे मार्मिक नमुने आहेत. प्रशासकीय भाषेच्या रूपाचेही येथे विवेचन केले आहे. वास्तविक या भाषेत आज्ञाच असते; पण ती वेगळ्या पद्धतीने येते. उदा० हे करण्यात यावे, किंवा हे केले जावे, असे सांगण्यात यावे किंवा असे सांगितले जावे. भाषेच्या विविध वळणांचा असा परिचय येथे घडतो.

मुलांना सतत प्रश्न पडत असतात. ही त्यांची स्वाभाविक प्रवृत्ती लक्षात घेऊन

'प्रश्नोत्तरे' या प्रकरणात प्रश्नवाचक शब्दांना महत्त्वाचे स्थान दिले आहे. 'प्रश्नोत्तर' या प्रकरणात मुलाखत कशी घ्यावी याचेही मार्गदर्शन आहे. काही शब्द तयार करून त्यांना वेगवेगळे प्रश्न विचारून वाक्ये कशी तयार करावीत, व त्यांच्यापासून निबंध कसा लिहावा, याचेही दिग्दर्शन या प्रकरणात केले आहे. एखाद्या घटनेवरून किंवा गोष्टीवरून संवाद कसा लिहावा, यासाठी एका कॅनेडियन लोककथेवरून कासव व बेडूक यांची संवादात्मक गोष्ट लिहिली आहे व संवादलेखनाचे तंत्र सांगितले आहे. तसेच नाटकातील संवादाचे नमुने देऊन नाट्यप्रवेश लिहिताना कोणकोणत्या गोष्टींचा विचार करावा, ते सांगितले आहे. एखाद्या घटनेचा, घडलेल्या गोष्टीचा वृत्तान्त कसा द्यावा, याचेही नमुने सादर केले आहेत.

वाक्प्रचार व म्हणी यातून भाषेची श्रीमंती कळते. वाक्प्रचार व म्हणी भाषिक अभिव्यक्ती अतिशय उत्कट व परिणामकारक करतात. लेखिकेने येथे सहसा न वापरल्या जाणाऱ्या वाक्प्रचारांचा विचार केला आहे. विस्मरणात गेलेल्या वाक्प्रचारांची उदाहरणे दिली आहेत. उदा० गुळानं मरतो तेथे विष कशाला?, अडले कोल्हे मंगळ गाय, घाईत घाई न् विंचू डसला ग बाई. स्वयंपाक करणे या क्रियेतील विविध बारीकसारीक गोष्टी लेखिकेने जवळजवळ पन्नास क्रियापदांतून मांडल्या आहेत. उदा० पाखडणे, निवडणे, कुटणे, कांडणे, दळणे, चिरणे, भिजविणे, तिंबणे, वाफवणे वगैरे.

'समानार्थी शब्द' या प्रकरणातून लेखिकेने मराठी भाषेची श्रीमंती दाखविली आहे. या प्रकरणात शब्दांना केवळ समानार्थी प्रतिशब्द दिलेले नाहीत तर त्यांचे उपयोजन व त्यांच्यातील बदलणाऱ्या अर्थच्छटाही दिल्या आहेत. श्रेष्ठ कवी आणि लेखक नवनवे शब्द *निर्माण करून भाषेची श्रीमंती कशी वाढ़वितात* तेही लेखिकेने मार्मिकपणे दाखविले आहे.

'शब्दक्षेत्र' या प्रकरणातूनही लेखिकेने भाषेचे वैभव दाखविले आहे. शब्दक्षेत्र म्हणजे काय, हे लेखिकेने विद्यार्थ्यांना छान समजावून सांगितले आहे. ''एक प्रकारे शब्दाचे सख्खे आणि दूरचे नातेवाईक, मित्र, शेजारीपाजारी यांचा तो मोठा परिवार असतो. (पृ० ५८१, दुसरा खंड) उदाहरण म्हणून त्यांनी 'फूल' या शब्दाचे क्षेत्र दाखविले आहे. पाकळी, कळ्या, झाड, वेल, बहर, दरवळ, पराग, पुष्परचना, फुलपाखरे, गुच्छ, इ० शब्द म्हणजे 'फूल' या शब्दाचे क्षेत्र होय.

भाषा ही एक सामाजिक संस्था आहे. तिच्यात नित्य आदान-प्रदान चालू असते. नव्या ज्ञानाबरोबर नवे शब्द निर्माण होत असतात. नव्या संकल्पना नवे शब्द घेऊन येतात. या सगळ्या गोष्टींचा परामर्श लेखिकेने 'थोडे द्यावे थोडे घ्यावे. देता घेता श्रीमंत व्हावे.' या प्रकरणात घेतला आहे.

इंग्रजी वळणाचे आणि हिंदी वळणाचे मराठी कसे असते, व त्याचा अतिरेकी वापर





अनुक्रमणिका

कसा होत आहे याचे नमुने लेखिकेने दिले आहेत. परकीय भाषांच्या प्रभावामुळे मूळ मराठी वळण कसे बदलते त्याची काही उदाहरणे लेखिकेने दिली आहेत. त्यांनी केवळ इतर भाषांतून आलेल्या शब्दांचाच विचार केला नाही तर मूळ वाक्यरचनांवरील त्या शब्दांच्या प्रभावाचाही विचार केला आहे.

लेखनसंवादाच्या भाषेचे विशेष सांगताना त्यांनी लेखनभाषेच्या तसेच संवादभाषेच्या विविध छटा टिपल्या आहेत. वृत्तपत्राच्या नजरेतून एखादी घटना जशी सांगितली जाते तशी आपण आपल्या दैनंदिन जीवनात सांगत नाही किंवा लिहितही नाही. पोलिसांच्या नजरेतून या घटनेला वेगळे भाषिक रूप प्राप्त होते. तर लेखक आपल्या दृष्टीने ती वेगळ्या पद्धतीने मांडतो. घटना एकच असली तरी तिचे आविष्करण कसे वेगवेगळे रूप धारण करते, ते लेखिकेने उदाहरणासहित दाखविले आहे. युवाभाषेचे किंवा व्रात्यभाषेचे वैशिष्ट्यही पुरंदरे यांनी नेमकेपणाने सांगितले आहे. 'व्रात्यभाषा दर दोनचार वर्षांनी बदलत असते. शिवाय अख्ख्या महाराष्ट्रातील तरुण एकाच प्रकारची भाषा बोलत नसतात. प्रदेशानुसार, शहरानुसार, शहरातील पेशानुसार, इतकेच नव्हे; तर शाळा-महाविद्यालयानुसार आणि त्यातील गटांनुसारही तिचा ढंग बदलत असतो. किंबहुना आपली खास भाषा असावी, ती ऐकून इतर लोक बुचकळ्यात पडावेत आणि आपल्याला खुदखुदायला निमित्त मिळावे, हेच ह्या भाषेतील खास तत्त्व असते.' (पृ० ४३६) व्रात्यभाषेचे मार्मिक नमुनेही त्यांनी सादर केले आहेत.

क्रियापदाची विविध रूपे सांगताना लेखिकेने जे अनेक गद्यखंड सादर केले आहेत ते सुंदर ललितगद्याचे नमुनेच आहेत. लेखिकेने 'आज्ञार्थ'चे केलेले विवेचनही असेच लक्ष वेधून घेणारे आहे. खरे तर आज्ञार्थी वाक्ये मुलांना आवडत नाहीत; पण लेखिकेने दिलेली आज्ञार्थाची उदाहरणे मुलांना आवडतील अशी आहेत. आज्ञार्थाचे पुढील उदाहरण पाहा : या उदाहरणात लहानपणी नाटक बसविलेला प्रसंग रंगविला आहे. 'पहिलीच तालीम प्रत्यक्ष प्रयोगापेक्षा जास्त संस्मरणीय ठरली. माझे वाक्य होते : ''राजकन्येऽ राजपुत्राच्या आठवणीनं तू झुरू नकोस. तो तुला लवकरच भेटेल, असा मी आशीर्वाद देतो.'' राजकन्या झालेली, समोरच्या वैद्यांची मधुरा मख्ख चेहऱ्याने माझ्याकडे बघत होती. मागून प्रतिभाताई कुजबुजत होती. ''हं, टिंबू म्हण, राजकन्येऽ राजपुत्राच्या आठवणीनं...'' तिचे दोन-तीनदा ऐकून झाल्यावर मी एकदम मधुरावर ओरडलो. ''अगं, झुरं ना! त्याशिवाय मी झुरू नकोस, असं कसं म्हणणार?'' यावर हसण्याचा असा काही स्फोट झाला, की मधुरा घाबरून रडायलाच लागली.'' (पृ० २२०)

त्रिविध काळाचा परिचय करून देताना लेखिकेने भाषेचा उत्तम नमुना असलेल्या गद्य खंडांचा वापर केला आहे. भविष्यकाळाची कशी रूपे होतात हे सांगताना लेखिकेने मुलांचे भावविश्व रंगविले आहे.

व्याकरणाच्या या पुस्तकात भाषेचे विविध विभ्रम सांगताना लेखिकेचे कवितेवरील प्रेम व्यक्त झाले आहे. या ग्रंथात लेखिकेने विविध कवितांचा समयोचित उपयोग केला आहे. ती लिहिते : ''कवितेचे निराळेच असते. स्वभाव निराळा, तिची रचना निराळी. तिच्या लयीशी, तिच्या तालाशी जुळणारे, तिच्या इतर शब्दांच्या स्वभावाशी जमवून घेत नेमका अर्थ पोचवणारे शब्द सापडले, की ती खुलते.'' (पृ० ३९४)

या व्याकरणविषयक व भाषाविषयक ग्रंथाच्या प्रकरणांना मुलांना आवडतील अशी आकर्षक शीर्षके आहेत. 'कर्म' या प्रकरणाचे पर्यायी शीर्षक आहे, 'क्रियापदाच्या कर्माची ही कहाणी'. वर्तमान ज्यावरून कळतो ते शब्द म्हणजे 'सध्या, हल्ली, आजकाल, आज, आत्ता' हे शीर्षक वर्तमानकाळ या प्रकरणाला आहे. सगळीच शीर्षके वाचकाच्या मनात उत्सुकता निर्माण करणारी आहेत.

'स्वाध्याय' हे या ग्रंथाचे खास वैशिष्ट्य म्हणावे लागेल. बुद्धिमान विद्यार्थ्यांना हे स्वाध्याय न वाटता खेळच वाटतील. दोन खंडांत मिळून एवढे स्वाध्याय आहेत की लेखिकेला त्यांच्या केवळ उत्तरांसाठी तिसरा वेगळा खंड करावा लागला आहे. स्वाध्यायांमध्ये शब्दकोडी तसेच शब्दांचे आणि भाषेचे मजेदार खेळही आहेत. हे स्वाध्याय केवळ विद्यार्थ्यांनीच नव्हे; तर प्रौढ जिज्ञासू वाचकांनीही सोडविण्यासारखे आहेत. यातील काही स्वाध्यायांचा खास उल्लेख करायला पाहिजे. उदाहरणार्थ अस्ताव्यस्त पडलेली पुस्तके वर्णक्रमानुसार लावणे, निरर्थक लांबच्या लांब शब्दबंबाळ वाक्यातून लेखकांची नावे शोधून काढणे, बाजारातील विविध फलकांवरील चुका शोधणे, इत्यादी.

चित्र, संगीत आणि साहित्य या कलांचा दुर्मीळ संयोग आणि त्यातच विनोदाचे सुखद शिडकावे यामुळे या ग्रंथाला सौंदर्याचा साज चढला आहे. स्वतः लेखिका माधुरी पुरंदरे यांच्यातील अभिजात कलासक्त व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार या ग्रंथात ठायी ठायी झाला आहे. आशयाला अत्यंत अनुरूप अशा चित्रांनी या ग्रंथातील घटना आणि प्रसंग त्यांनी साक्षात केले आहेत. मानवी चेहरे, व्यक्तींच्या भावमुद्रा, विविध व्यक्तींमधील नाट्यमय प्रसंग, निसर्गदृश्ये, घरे, इमारती, फुले, गोष्टीतील प्रसंग, इ० विषयांवरील चित्रांचा उपयोग व्याकरण व भाषा यांची वैशिष्ट्ये समजावून देण्यासाठी प्रभावीपणे केला आहे. पुस्तकांचा गठ्ठा पडून त्यांच्या ढिगाऱ्यात पडलेला मुलगा, आईबाबांचे भांडण ऐकणारा टिंब्या, पंख पसरलेला महाकाय पक्षी, पोलिसाची भेळ पळविणारा कुत्रा, अशा कितीतरी बोलक्या चित्रांनी या ग्रंथांतील आशय समृद्ध झाला आहे. या चित्रांबरोबरच आशयाला अत्यंत समर्पक अशी संदेश भंडारे यांची छायाचित्रेही या ग्रंथात वापरली आहेत. पुरातन दगडीवाडा, भाजीबाजार, पुराने वेढलेले गाव, किल्ल्याची तटबंदी, जत्रेतील दुकाने, ही छायाचित्रे भाषेबरोबरच आपल्या संस्कृतीचाही परिचय करून देतात.

संपादन आणि मुद्रितशोधन हे खरे तर अत्यंत महत्त्वाचे विषय आहेत. पण

विद्यार्थ्यांच्या दृष्टीने विशेषत: शाळकरी मुलांच्या दृष्टीने ते अवघड आहेत. त्यांचा लेखिकेने विस्ताराने नाही; पण स्थूल स्वरूपात परिचय करून दिला आहे. याऐवजी लेखिकेने व्यवहारातील मराठी शब्द आणि वाक्यरचना यांवर अधिक भर द्यावयास हवा होता. प्रसारमाध्यमांतील मराठीच्या वापराचा अधिक विचार करावयास हवा होता. वर्तमानपत्र आणि दूरदर्शन या प्रसारमाध्यमांतील मराठीचा विद्यार्थ्यांच्या मनावर मोठा प्रभाव पडतो. त्यामुळे विपरीत अशी वाक्यरचना होऊ लागली आहे. व्यवहारात सदोष शब्द आणि विधाने केली जाऊ लागली आहेत. लिंग, वचन यात घोटाळे केले जाऊ लागले आहेत. या सगळ्या गोष्टींचा परामर्श या ग्रंथात घेतला असता तर ते अधिक उपयुक्त झाले असते.

माधुरी पुरंदरे यांनी हा ग्रंथ परिश्रमपूर्वक सिद्ध केला आहे. ग्रंथाची शैली सहज आणि 'अप्रयत्नवत्' वाटावी अशी आहे. भाषेचे सर्वव्यापित्व, तिचे सौंदर्य आणि अंतरंगातील श्रीमंती यांचे सर्वांगीण दर्शन माधुरी पुरंदरे यांचा 'लिहावे नेटके' हा ग्रंथ घडवितो. भाषेचे अंतरंग दाखवतानाच तो आपल्याला संस्कृतीच्या प्रांगणात नेतो. विद्यार्थ्यांना व जिज्ञासू वाचकांना हा ग्रंथ उद्‌बोधक आणि रंजक वाटेलच. पण व्याकरण व भाषा यांचे अध्यापन करणाऱ्या शिक्षकांनाही तो मार्गदर्शक वाटेल, असा मला विश्वास वाटतो. ■

---

## परदेशातील मराठी

परदेशात मला हे अनेक वेळा जाणवायचे, तिथली लहान मुले मराठी अगदी आवडीने बोलतात; पण, ते जेव्हा संगणकावर ती लिहू पाहतात तेव्हा मात्र त्यांच्या मनात एक गोंधळ सुरू होतो. आपण उच्चारत असणारा शब्द आणि आत्ता करत असलेले स्पेलिंग याची तफावत त्यांना त्या शब्दाचा संगणकीय उच्चार करायला भाग पाडते आणि म्हणूनच तिथे जन्मलेल्या आपल्या बांधवांचे मराठी हे एखाद्या आज्ञावालीसारखे (प्रोग्राम) होते. भाषेचे असे आधी उच्चारण्यातून, मग लिखाणातून आणि सरतेशेवटी बोलण्यातून, नष्ट होणे मराठीला घातक ठरायची भीती आहे. वारकऱ्यांनी ज्ञानोबा-तुकोबांची मराठी वर्षानुवर्षे टिकविली; कारण, ती उच्चारात सक्षमपणे जिवंत होती. पण, संगणक युगात हे उच्चारण नष्ट होण्याचा धोका आहे. मराठीतल्या मातब्बर लोकांनी, इथल्या तिथल्या श्रीमंत मराठी माणसांनी काही निधी उभा करून या पद्धतीची उच्चाराधिष्ठित मराठी संगणकावर कशी येईल हे पाहायला हवे. याला जर आवश्यक आर्थिक पाठबळ उभे राहिले आणि सॉफ्टवेअर कंपन्यांवर योग्य तो दबाव आपण टाकू शकलो तर हे काम चुटकीसरशी होऊन जाईल. हे काम करणारे नवीन युगातले भाषाप्रभूच ठरतील.

[ दीपक करंजीकर, 'लोकराज्य', ऑक्टोबर २०११ ]

---

# उपयुक्त संदर्भग्रंथ

विजया चौधरी

[परीक्षित पुस्तक : 'लघुनियतकालिकांची वर्णनात्मक सूची', रफीक सूरज. प्रकाशक लोकवाङ्मय गृह, मुंबई. पृष्ठे १७२. किंमत ₹ २००/-]

रफीक सूरज यांनी अभ्यासकांसाठी लघुनियतकालिकांची वर्णनात्मक सूची तयार केली आहे. आधुनिक मराठी वाङ्मयाच्या इतिहासात लघुनियतकालिकांच्या चळवळीला असलेले महत्त्व ध्यानात घेऊन त्यांनी संग्रही असलेल्या लघुनियतकालिकांची सूची तयार केली आहे. १९५५ ते २००५ या पन्नास वर्षांच्या कालावधीतील लघुनियतकालिकांचा या सूचीत समावेश आहे. ही सूची सर्वसमावेशक असल्याचा त्यांचा दावा नाही.

पुस्तकाच्या सुरुवातीला लेखकाने लघुनियतकालिकांच्या चळवळीचे स्वरूप आणि वैशिष्ट्ये विशद करणारा लेख लिहिला आहे. त्यामध्ये या चळवळीमागची पूर्वपीठिका, तिचे स्वरूप, पारंपरिक व्यवस्थेला नाकारताना अवलंबिलेले प्रकटीकरणाचे भिन्न मार्ग, विचारांची बंडखोरी, प्रस्थापित व्यवस्थेत नवलेखकांची होणारी घुसमट अशा अनेक पैलूंवर प्रकाश टाकला आहे. त्यामागील कारणांची चिकित्सा करून या चळवळीचे साहित्यिक व सांस्कृतिक महत्त्व अधोरेखित केले आहे. या लेखासोबत सूचीत अंतर्भूत असलेल्या लघुनियतकालिकांच्या स्वरूपाविषयी संक्षिप्त नोंदींचा तक्ता दिलेला आहे. या तक्त्यात लघुनियतकालिकांच्या नावांचा आद्याक्षरानुसार क्रम लावून अंकक्रमांक, प्रकाशन वर्ष, एकूण पृष्ठसंख्या, अंकाचा आकार, संपादक, अंकाविषयी विशेष नोंद व प्रकाशनाचे ठिकाण अशी क्रमवार माहिती दिली आहे. एकूण ५८ लघुनियतकालिकांचे २७२ अंक यात नोंदलेले दिसतात. १९५५ सालच्या 'शब्द' या पहिल्या लघुनियतकालिकापासून आजपर्यंत शंभरच्या आसपास लघुनियतकालिके निघाली असावीत, असे निरीक्षण सूचिकाराने नोंदविले आहे. त्या दृष्टीने सूचीमध्ये निम्म्याअधिक अंकांचीच नोंद झालेली दिसते. सूचीचा कालखंड २००५ सालापर्यंत धरला असला तरी जून २००० सालच्या 'शब्दवेध'नंतरची एकही नोंद आढळत नाही.

सूचिकाराने लघुनियतकालिकांत प्रसिद्ध झालेल्या मजकुराच्या विषयावर नोंदी करताना अनुवादित साहित्याचा स्वतंत्र विभाग केला आहे. दोन्ही विभागांत लेखकांच्या नावानुसार अकारविल्हे क्रम लावून कविता, कथा, कादंबरी/कादंबरीचा भाग, नाटक/

एकांकिका ललित लेख/निबंध, व्यक्तिपरिचय, लेख, टिपणे, मुलाखत/चर्चा, ग्रंथपरीक्षण असे विभाग पाडले आहेत. अनुवादित साहित्याच्या नोंदी मूळ लेखकांच्या नावानुसार आहेत. लघुनियतकालिकांमधील संपादकीय लेखन किंवा त्यात प्रसिद्ध झालेल्या साहित्याबद्दल शंका/आक्षेप घेणारे लेखन, इतकेच नव्हे; तर मुखपृष्ठ, रेखाचित्रे व या कशातही समावेश होऊ न शकणारे असे 'इतर' काही लेखन यासंबंधीच्याही नोंदी पुस्तकाच्या अखेरीस स्वतंत्रपणे केल्या आहेत.

नोंदी अचूक व्हाव्यात यासाठी सूचिकाराने भूरपूर परिश्रम घेतलेले आहेत, लघुनियतकालिकांचे त्रोटक आणि विभिन्न स्वरूप पाहता, त्यातील लेखनाचे साहित्यप्रकारांनुसार वर्गीकरण करणे, तसेच मुखपृष्ठ, चित्रे इ० साहित्यबाह्य वैशिष्ट्यांच्याही नोंदी करणे ही सोपी गोष्ट निश्चितच नव्हती. नियोजित कालखंडातील सर्व लघुनियतकालिके उपलब्ध होऊ न शकल्याने तसेच उपलब्ध नियतकालिकांतही पृष्ठक्रमांक, प्रकाशन कालखंड, अंकक्रमांक इत्यादीबाबत शिस्त पाळलेली नसल्याने किंवा टोपणनावाने लेखन केलेल्या काही जणांची नावे उपलब्ध नसल्याने या सूचीला मुळातच मर्यादा पडलेल्या आहेत. याच कारणांनी सूचीची शिस्त पूर्णपणे पाळता आलेली नाही, असे सूचिकाराने मनोगतात स्पष्ट केले आहे. तरीही काही त्रुटींकडे लक्ष वेधावेसे वाटते.

संक्षिप्त नोंदींच्या तक्त्यात 'संवाद' या नियतकालिकाबद्दलच्या विशेष नोंदीत 'अशोक नायगावकरांच्या २५ कविता व त्यावरील समीक्षा लेख' असे नोंदवून त्याखाली डिट्टो अशी खूण पाचवेळा केली आहे. ते पाचही अंक 'संवाद'चे नसून 'संसद'चे आहेत (पृ० ३७-३८). वर्णनात्मक सूचीमध्ये कविता, कथा इ० विभागांत 'नव्यांची अक्षरचळवळ' या अंकाची नोंद दिसते. सुरुवातीला दिलेल्या संक्षिप्त नोंदींच्या तक्त्यामध्ये मात्र या नावाच्या अंकाची नोंद दिसत नाही. त्यामुळे 'अक्षरचळवळ' व 'नव्यांची अक्षरचळवळ' ही दोन वेगवेगळी नियतकालिके आहेत का, हे स्पष्ट होत नाही. (पाहा पृ० ४३, ज्योतिका ओझरकर, पृ० ११६, सोनटक्के क०दि० इ०) 'वैद्य नीलिमा' ही नोंद 'वैश्य नीलिमा' अशी चुकीची झाली आहे. (पृ० १००).

विषयवार वर्गीकरणात काही वेळा पृष्ठक्रमांक देताना गफलत झालेली दिसते. उदा० 'कविता' विभागात अव्यक्त, पाठीमागे, ऋचा, अंक ८, डिसेंबर ७६, पृ० ११८ (पृ० ४०) किंवा 'कथा' विभागात कपूर रविंदर नाथ, पाच जुन्यातुसल्या गोष्टी, 'असो', अंक १२, पृ० १८५ (पृ० ११०) अशी नोंद आहे. संक्षिप्त तक्त्यात 'ऋचा' अंकाची पृष्ठसंख्या १६ अशी दिलेली आहे. (पृ० २७), तर 'असो' या लघुनियतकालिकाच्या एकूण पंधरा अंकांच्या नोंदी आहेत, त्यापैकी एकाही अंकाची पृष्ठसंख्या उपलब्ध नाही (पृ० २४). अशा परिस्थितीत पृष्ठक्रमांकाच्या सत्यतेची खात्री पटत नाही. शिवाय ११८ किंवा १८५ पृष्ठे असणाऱ्या नियतकालिकाला 'लघु' तरी कसे म्हणावे असा प्रश्न

पडतो. अशा गफलतींची आणखी उदाहरणे दाखवता येतील. 'कथा' विभागातच दंडवते वृंदावन, पंजा, 'अथर्व'. अंक १, पृ० ७० अशी नोंद आहे (पृ० ११३). संक्षिप्त तक्त्यात 'अथर्व'च्या फक्त एकाच अंकाची नोंद आहे! त्याचे प्रकाशन वर्ष १९६६ व एकूण पृष्ठसंख्या ९४ दिलेली आहे (पृ० २३). दंडवते वृंदावन ही नोंद याच अंकातील लेखनाविषयी असावी, असे तर्काने गृहीत धरावे लागते. तसेच शंकर वैद्य आणि वैद्य शंकर वि० अशी एकाच लेखकाची एकापाठोपाठ नोंद दोनदा येते. (पृ० १३३)

ढोबळ मानाने अशा त्रुटी दिसत आहेत. तरीही वाङ्मयाच्या इतिहासात लघुनियतकालिकांचे स्थान वादातीत आहे. त्यामुळे त्याची दस्त स्वरूपाची नोंदणी होणे गरजेचे होते. त्या दृष्टीने ही सूची नक्कीच दिशादर्शक ठरेल. सूचिकाराने ही लघुनियतकालिके कुठे व कशी मिळू शकतील यासंबंधीचे मार्गदर्शन करायला हवे होते. तसेच 'नवाक्षरदर्शन'च्या लघुनियतकालिक विशेषांकांचा (एप्रिल-मे-जून २००९) सुरुवातीच्या विवेचक लेखात उल्लेख करायला हवा होता. असे असले तरी या पुस्तकाच्या रूपाने एक महत्त्वाचा संदर्भ-ग्रंथ अभ्यासकांसाठी उपलब्ध होत आहे, हे निश्चित महत्त्वाचे आहे. ■

## वाचनसंस्कृतीचे घोषवाक्य

सोलापूरचे भूषण असलेले संशोधक आणि तज्ज्ञ शिलालेखवाचक श्री० आनंद कुंभार यांनी कुडल येथील संगमेश्वर मंदिराच्या सभामंडपाच्या तुळईवरचा शिलालेख शोधून काढला आहे. त्यावर कोरलेले आहे- **'वांछि तो विजया होईवा'** म्हणजे 'जो वाचेल त्याचा विजय होईल.' वाचनसंस्कृतीचे म्हणजे पर्यायाने साहित्यसंस्कृतीचे हे घोषवाक्यच म्हणायचे. हा शिलालेख ज्ञानेश्वरपूर्व तीनशे वर्षांचा असावा. याची आणखी वैशिष्ट्ये म्हणजे हा खाली पडलेला वा भिंतीत बसवलेला नाही तर शिरोभागी आहे. तुळईवरचा म्हणजे तोलून धरणारा, दृष्टी उन्नत केली तरच दिसणारा. दुसरे म्हणजे अशा काही शिलालेखात शिव्या कोरलेल्या असतात तर उलट या शिलालेखात शाप देण्याऐवजी वर देण्यात आलेला आहे. या शिलालेखात कुण्या पंडिताच्या सत्काराचा संकेत आहे. म्हणजे ज्ञानाच्या गौरवाचा. हा लेख वाचणाऱ्याचाही विजय होईल, असा हा वर आहे. हा लेख पवित्र संगमस्थळावर आहे. हा सांस्कृतिक संदर्भही अर्थपूर्ण आहे. सामान्य माणसाला विवेक, विचार, विश्वास देणारे वाचन अंधारावर, दहशतीवर, भ्रष्टाचरणावर, अशिवावर, असुंदरावर विजय मिळवून देईल.

[ निशिकांत ठकार, 'पंचधारा', ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २०१०, पृ० ६४ ]



अनुक्रमणिका

# आपल्या भाषा पुरेशा विकसित आणि समर्थ आहेत

विनोबा

कित्येक लोकांच्या मनात असा भ्रम आहे की आपल्या भाषा पुरेशा समर्थ नाहीत आणि आजच्या जमान्यात सर्व व्यवहार आपल्या भाषेत चालू शकणार नाहीत. हा भ्रम पूर्णपणे काढून टाकला पाहिजे. हे मी आपल्या भाषेच्या अभिमानामुळे केवळ सांगत नाही; परंतु हीच खरोखर वस्तुस्थिती आहे.

खरे पाहता आपल्या भाषा खूपच विकसित भाषा आहेत. शेकडो वर्षांपासून आपल्या सर्व भाषांचा विकास होत आला आहे. आजपर्यंत त्यांचा खूपच विकास झाला आहे व पुढेही तो होणार आहे. पाहा, कन्नड भाषेत एक हजार वर्षांपासून उत्तम साहित्य लिहिले जात आहे. त्यांत ज्ञान काही कमी नाही. खरे पाहिले म्हणजे एक हजार वर्षांपूर्वी इंग्रजी भाषा नव्हती. मी पाहिले की तमिळ भाषेत केवढे प्राचीन साहित्य आहे! कदाचित संस्कृत वगळता एवढे विशाल साहित्य हिंदुस्थानच्या कोणत्याही प्रचलित भाषेत नाही. आणि असे असूनही आपण असे मानतो की आमची भाषा पुरेशी विकसित नाही किंवा पुरेशी समर्थ नाही!

दुसरे एक उदाहरण देतो. 'कॅन्टरबरी टेल्स' हा इंग्रजीतील बाराव्या शतकातील ग्रंथ आहे. त्याच वेळी लिहिलेला ज्ञानेश्वर महाराजांचा 'ज्ञानेश्वरी ग्रंथ' हा मराठीत आहे. दोन्ही पुस्तके मी वाचली आहेत. दोघांचाही मी अभ्यास केला आहे. ज्ञानेश्वरीमध्ये जेवढे शब्द आहेत, त्याच्या एकचतुर्थांश देखील शब्द 'कॅन्टरबरी टेल्स'मध्ये नाहीत. आणि 'ज्ञानेश्वरी' हा काही मराठीमधील पहिला ग्रंथ नाही. त्याच्यापूर्वीही पुस्तके लिहिली आहेत. मला हे सांगावयाचे आहे की आपल्या सर्व भाषा फार विकसित भाषा आहेत. त्यांत संस्कृत तर फारच समृद्ध आहे.

ही गोष्ट खरी आहे की, आपल्या भाषेत विज्ञानाच्या गोष्टी नाहीत. परंतु हे आधुनिक विज्ञानाचे साहित्य किती वर्षांचे आहे? फार फार तर शंभर-दोनशे वर्षांचे आणि हे सर्व लिखाण आपल्या भाषेत न आल्यामुळे विज्ञानाचे साहित्य इंग्रजीतच सध्या अधिक येत आहे. परंतु जसजसे आपल्या भाषेत विज्ञान अंतर्भूत होईल तसतसे विज्ञानाच्या बाबतीतही आपल्या सर्व भाषांचा अवश्य विकास होईल, ह्यात शंका नाही.

ह्या गोष्टीकडे जरा दुसऱ्या दृष्टीने पाहा. विज्ञानाचा प्रसार आपल्याकडे विशेष न झाल्याने त्याचे शब्द आपल्या भाषेत आज नाहीत. परंतु तशीच स्थिती इंग्रजी भाषेची



अनुक्रमणिका

दुसऱ्या क्षेत्रात आहे. माझेच उदाहरण देतो. एकदा बुनियादी शिक्षणाची एक समिती दिल्लीत एकत्र आली होती. डॉ० झाकीर हुसेनही त्यांत होते. इंग्रजी भाषेत चर्चा चालली होती. त्यात शब्द आला 'कोरिलेशन'. मी म्हणालो, मी कोरिलेशन जाणत नाही; पण 'समवाय' जाणतो. आणि समवायला इंग्रजीत काय म्हणतात ते मी जाणत नाही.

'समवाय' मी जाणत आहे; कारण ती माझ्या शिक्षणाची पद्धती आहे. ती बाहेरून आली नाही, तर ती माझ्या जीवनाशी निगडित आहे.

त्यानंतर त्या लोकांनी मला सांगितले की तुम्ही समवायचा जर इंग्रजी पर्याय सांगू शकत नसाल तर त्याचा अर्थ समजून द्या. तेव्हा मी त्यांच्यासमोर समवाय पद्धतीवर एक व्याख्यानच देऊन टाकले. मातीचा घडा बनविला. मातीपासून घडा वेगळा आहे किंवा नाही? जर तुम्ही सांगाल की वेगळा आहे तर मी सांगेन माझी माती मला द्या व तुमचा घडा तुम्ही घेऊन जा! आणि दोन्ही एक आहेत असे जर सांगाल तर मी सांगेन, पाहा ती माती! ती घ्या आणि दोन्ही जर एक असतील तर त्यांत माती भरून दाखवा. तात्पर्य असे की, ते दोन्ही एक आहेत असेही सांगता येणार नाही आणि वेगळे आहेत सांगता येणार नाही. त्याच रीतीने ज्ञान आणि कर्म वेगळे आहेत असे सांगता येणार नाही आणि एक आहे असेही सांगता येणार नाही. हा आहे समवाय. त्याला ह्यासाठी एखादा इंग्रजी शब्द असेल, पण तो मला कुठे येतो?

अशा रीतीने शब्दांच्या बाबतीत असे आहे की ज्या क्षेत्राचा प्रसार झाला असेल त्या क्षेत्राचे शब्द त्या भाषेत असतात. इंग्रजीत विज्ञानाचा प्रसार झाला आहे; त्यामुळे त्यासंबंधीचे शब्द आणि त्याची परिभाषा त्या भाषेत आहे. परंतु ज्या क्षेत्राचा प्रसार त्यात अंतर्भूत झाला नाही त्याचे शब्द त्यात फार कमीच असतील. उदाहरणार्थ, अध्यात्माचा प्रचार आपल्याकडे जेवढा झाला आहे तेवढा तेथे नाही. म्हणून मला अनेकदा वाटते की कृष्णमूर्तींची व्याख्याने तेथील लोकांना कशी समजत असतील? ते भारतीय भाषेत नव्हे तर इंग्रजीत व्याख्याने देतात. ज्या शब्दांच्या बरोबर विचार जोडलेला असतो त्यांना खास 'कोनोटेशन' असते. परकीय भाषेत जे कोनोटेशन असतात ते बऱ्याच वेळेला आपल्या शब्दांच्या कोनोटेशनबरोबर मिळतेजुळते नसतात. पाहा, इंग्रजीत 'माइन्ड' म्हणतात. माइन्ड म्हणजे तुम्ही काय समजलात? आपल्याकडे तर किती विविध अर्थाचे शब्द आहेत- मन, बुद्धी, चित्त, अहंकार, अंत:करण. कारण की आपल्याकडे अध्यात्माचे क्षेत्र फार रुजलेले आहे आणि प्रत्येक बाबतीत फार सूक्ष्म विचार झालेला आहे. म्हणजे विविध अर्थाचे अनेक शब्द तयार झालेले आहेत. तसे शब्द जे अध्यात्मात मिळतात तसे इंग्रजीत नसतात.

मला तर असे वाटते की मानसशास्त्राच्या बाबतीतही आपल्याकडे अत्यंत सखोल असा विचार झालेला आहे. आपले शब्द पाहा. चित्तशुद्धी अथवा चित्तवृत्तिनिरोध असे





अनुक्रमणिका

शब्द इंग्रजीत सापडणार नाहीत. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात अथवा सामाजिक क्षेत्रातही ही स्थिती आहे. समाजशास्त्र व राज्यशास्त्रही याला अपवाद नाही. म्हणून या सर्व क्षेत्रांत जर आपण इंग्रजीवर अवलंबून राहिलो तर आपली विचार करण्याची पद्धती गोंधळात पडेल. इंग्रजीत ह्या सर्व बाबतीत सूक्ष्म विचारासाठी पुरेसे शब्द नाहीत. थोडक्यात, विज्ञानाच्या क्षेत्रात आपल्या भाषेत पुरेसे शब्द नाहीत म्हणून आपली भाषा पुरेशी समर्थ नाही असे मानणे पूर्ण अवास्तविक आहे. आपल्या भाषा तर अतिशय विकसित भाषा आहेत. आपल्याकडे विज्ञानाचा जसजसा अभ्यास होईल तसे त्या क्षेत्रातही आपल्या भाषा समृद्ध होतील आणि तोपर्यंत आपण इंग्रजी शब्द वापरू. असे शब्द वापरण्यात काय चूक आहे व काय कठीण आहे? एक भाग ऑक्सिजन आणि दोन भाग हायड्रोजन मिळून पाणी तयार होते. असे का सांगता येणार नाही? तशाच रीतीने लाऊडस्पीकर हा शब्द आहे. तो आपला कर्ता, कर्म आणि क्रियापद ह्यांच्यावर परिणाम केल्याशिवाय वाक्यरचनेत बसत असेल तर तो शब्द स्वीकारण्यात कोणतेच नुकसान नाही. असे शब्द सरळ इंग्रजीत आपणाकडे चालू शकतील. मोटर, स्टेशन, टेबल वगैरे शब्द पण आपण स्वीकारले तर त्यात काही हरकत नाही.

मुळात हे समजले पाहिजे की भाषेतील शब्द व्यवहारातून वाढतात. एका यंत्राच्या भागाची नावे अलगअलग असतात. ते यंत्र नीट घ्यावयाचे असेल तर अशी शंभर-दीडशे नावे माहिती करून घ्यावी लागतील. अशा नावांतून मोठा शब्दकोश तयार होतो. परंतु केवळ त्याने मात्र भाषेची शक्ती वाढत नाही. एक तर व्यवहार वाढतो आणि शब्दही वाढतात. तसेच काही शब्द आपल्या भाषेत नसले तरी त्यातून भाषेचे काही कमी होत नाही. खरे पाहता भाषेचे अस्सल सामर्थ्य तर धातु-सामर्थ्य आहे. भाषेची अस्सल शक्ती धातूची शक्ती आहे. कोणत्या भाषेत किती धातू आहेत त्यावर तिची शक्ती अवलंबून आहे. जास्तीत जास्त धातू लॅटिन व संस्कृतमध्ये आहेत. आपल्या भाषेत तुलनेने धातू कमी असतील, परंतु ते आपणांस संस्कृतमधून सहजगत्या घेता येतात. म्हणजे संस्कृत व आपली हल्लीची भाषा दोन्ही मिळून काही कमी सामर्थ्य आपल्या भाषेत आहे असे आपणांस जाणवणार नाही. म्हणून आपली भाषा समर्थ नाही हा विचार मनातून काढून टाका. आपल्या भाषेत काही कमी नाही, किंबहुना आपल्या भाषा तर फारच विकसित व समर्थ भाषा आहेत.

त्यामुळे आपल्या भाषेतून आजचा सर्व व्यवहार होऊ शकणार नाही ही गोष्ट चुकीची आहे. किंबहुना सर्व व्यवहार आपल्या भाषेतच झाला पाहिजे. विज्ञानसुद्धा आपल्या भाषेतूनच सामान्यजनांपर्यंत पोहोचविले पाहिजे. ही बाब निश्चित समजून घ्या; की जोपर्यंत विज्ञान मातृभाषेतून लोकांसमक्ष ठेविले जात नाही तोपर्यंत ते व्यापकपणे पसरू शकणार नाही. ह्यासाठी ते आपल्या सर्व भाषेतून आणणे अनिवार्य आहे.

ह्यासाठी मी तुम्हाला सांगतो की जे सर्व सुशिक्षित लोक आपल्या भाषेत विज्ञान नाही अशी जी ओरड करतात त्याऐवजी विज्ञान आपल्या भाषेत आणण्यास काहीतरी योगदान करतील तर बरे होईल. इंग्रजीत विज्ञानाची चांगली पुस्तके आहते ती सर्व आपल्या भाषेत आणली पाहिजेत. परंतु ह्यासंबंधी कुणी विचारच करत नाहीत. खरे पाहता ज्यांनी स्वत: इंग्रजीचे ज्ञान मिळविले त्यांनी व्रत घेतले पाहिजे की मी मरण्यापूर्वी एका चांगल्या इंग्रजी पुस्तकाचा माझ्या मातृभाषेत अनुवाद करीन. असा अनुवाद केल्याशिवाय मला मरण्याचा अधिकार नाही. असे झाले तरच आपल्या नंतरची पिढी इंग्रजीच्या ओझ्यापासून वाचू शकेल. पितृ-धर्माची ही जरुरी आहे. हे तर सहजपणे होऊ शकेल. त्यासाठी राज्याचीही मदत घेता येईल. असे झाले तर सुमारे दहा वर्षांत विज्ञानाविषयीचे इंग्रजी ज्ञान आपल्या भाषेत येऊ शकेल व त्याविषयी नंतर कुणाला तक्रार करण्यास जागा राहणार नाही.

हे सर्व सहजगत्या होणार नाही, त्यासाठी पुरुषार्थ करावा लागेल. आज अनेक क्षेत्रांत इंग्रजीशिवाय चालत नाही असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा त्याचबरोबर असा आपण विचार करीत नाही की इंग्रजीला हे स्थान मिळाले कशामुळे? काही आपोआप तर मिळाले नाही? त्यासाठी इंग्रजांनी केवढा मोठा पुरुषार्थ केला आहे. त्यामुळे आज तर परिस्थिति अशी आहे की आपल्या स्वत:च्या देशामधील भाषा जर आपणांस शिकावयाच्या असतील तर त्या इंग्रजीमार्फतच शिकाव्या लागतात. समजा, मला बंगाली भाषा शिकावयाची असली तर मला मराठी, गुजराथी किंवा कन्नड भाषेमार्फत ती शिकता येईल का? नाही. कारण मराठी, गुजराथी, कन्नडमध्ये मला बंगाली भाषेचा कोश मिळणार नाही. तो इंग्रजीत मिळेल. त्यामुळे मला इंग्रजीमार्फतच बंगाली शिकावी लागेल.

असेच बाहेरच्या भाषांबाबतही आहे. मध्यंतरी मी चिनी भाषा शिकत होतो. त्यासाठी माझ्याकडे जी पुस्तके आली ती इंग्रजीतच होती. म्हणजेच येथील व बाहेरची भाषा आपणांस इंग्रजीमार्फतच शिकता येईल अशी परिस्थिती आहे. कारण की इंग्रजी भाषेत प्रत्येक भाषेसंबंधीचा कोश मिळू शकतो. हे कोश असेच विनासहायच बनले असतील का? त्यासाठी त्या लोकांनी किती मेहनत केली असेल? खूप मेहनत करून त्या लोकांनी आपली इंग्रजी भाषा संपन्न बनविली आहे. ह्यासाठी त्यांच्याकडून बोधपाठ घेऊन आपणसुद्धा खूप मेहनत करून आपली भाषा संपन्न केली पाहिजे. असे काही करण्याऐवजी, बस, इंग्रजीशिवाय चालणार नाही; असे जर आपण रडगाणे गात बसलो तर ते उचित होणार नाही. हे तर आपल्या आळसाचे आणि आपल्या पुरुषार्थहीनतेचे लक्षण गणले जाईल. आपल्या गुलामीची मानसिक निशाणी गणली जाईल. आपल्या भाषेलादेखील आपण संपन्न बनवू या, अशी ईर्ष्या शिकलेल्या-सवरलेल्यांना चढली पाहिजे.

---

परंतु अशी ईर्ष्या कुठे आहे? त्यासाठी तर अध्ययनशील बनावे लागेल. व्यापारी, इंजिनियर वगैरे बनण्यास विज्ञान वाढवावे लागेल. विविध सामाजिक शास्त्रे शिकवावी लागतील. हे सर्व करावे लागेल. परंतु आज तर शाळा-कॉलेज सोडल्यानंतर आपले अध्ययनच समाप्त होत असते. तर हे सर्व कसे होईल?

ह्यासाठी मला हे सांगावयाचे आहे की आपल्या भाषा पुरेशा समर्थ आहेत. एवढेच नव्हे, तर इंग्रजीच्या तुलनेत फारच विकसित आहेत. त्यात विज्ञानाची जी कमतरता आहे त्याची पूर्तता आपण सर्वांनी केली पाहिजे आणि त्या बाबतीत आपल्या सर्व भाषा संपन्न होतील असे पाहिले पाहिजे. ह्यासाठी फार मोठा पुरुषार्थ करावा लागेल. ■

**साभार :**

'ज्ञान ते सांगतो पुन्हा', विनोबा, (मराठी अनुवाद - जयंतराव पाटील आणि मीना पाटील, संकलन - मिलिंद बोकील). कृषी उद्योग व आदिवासी कल्याण प्रतिष्ठान, बोर्डी, २००४ (आ० २, २००६), पृ० १६०-१६४

## भाषा : संस्कृतीची वाहक

भाषा ही केवळ व्यक्तींमध्ये संवाद साधणारी नसते, ती संस्कृतीची वाहक असते. अनेक पिढ्यांच्या ज्ञानाचा आणि अनुभवांचा त्यात संचय असतो. प्रख्यात आफ्रिकन लेखक एनगुगी वा थ्योंगो यांच्या शब्दात सांगायचे तर संस्कृती आपल्या मौखिक आणि लिखित साहित्याच्या माध्यमातून मूल्यसमूहाची अभिव्यक्ती करते. त्या मूल्यांमुळे आपल्याशीच आपली ओळख होते, आणि एकंदर विश्वास आपले स्थान काय आहे ते समजते. आपल्या भाषेपासून दूर करून आपण आपल्या मुलांना स्वत:चीच ओळख घेण्याची संधी नाकारत आहोत.

दुसरा एक मुद्दा येथेच मांडतो. घरीदारी बोली बोलणारी मुले शाळेत येतात आणि प्रमाण भाषा गिरवायला लागतात. बोली अशुद्ध, प्रमाण भाषा शुद्ध असे मत बिंबवले जाते. ते बरोबर नाही. प्रमाण भाषा आत्मसात करणे भाषिक व्यवहारासाठी आवश्यक आहे; परंतु बोली शाळेच्या वर्गाबाहेर ठेवणे अशक्यच असते. ती बोलण्यात-लिहिण्यात डोकावणार यात संशय नाही. मुलांना ती वापरू द्यावी, असे माझे मत आहे. दोन्ही भाषांना जोडणारा एक पूल असला पाहिजे. एखादा निबंध बोली भाषेत लिहायची परवानगी असली पाहिजे. एखाद्या ठिकाणी बोलीतला समर्पक शब्द वापरला तर चूक मानता कामा नये. मराठीच्या इतर बोलींचा परिचय करून दिला पाहिजे. बोली भाषेत लिहिलेल्या कविता, कथा, एकांकिका अभ्यासक्रमात असल्या पाहिजेत.

[ वसंत आबाजी डहाके, 'लोकसत्ता', दि० ४ फेब्रुवारी २०१२ ]

# कवितेचा अनुवाद म्हणजे

के० सच्चिदानंद

कवितेचा अनुवाद म्हणजे
पुनर्जन्मच तो.
पाण्यातून मासोळी सुळकांडी मारते
तसा अनुवादक या चित्तामधून त्या चित्तामध्ये
फिरून येतो एकेका शब्दाच्या किनारी
दाट रेतीवर पाय मुडपून
एकेका शंखाचा रंग न्याहाळत
एकेक शंख फुंकून पहात.

कवितेचा अनुवाद म्हणजे
आफतच ती. वेताळपंचविशीमधली
मस्तकांच्या अदलाबदलीची गोष्ट
आठवते ना? अनुवादक हा
दुसऱ्या कवीचं मस्तक बसवून घेतो
आपल्या धडावर. एकेक ओळ
म्हणजे झगडा, अपेष्टा, कंटाळा
यांच्या पायपिटीखालची वाटच,
म्हणजे संगीताची परिपाठी
अनश्वर, माणसं, देवादिक, वृक्ष
याची फरड. ओळ संपते ती अगाध
दरीच्या काठावर. मृतांचे आत्मे
त्या नीरवतेच्या जलाशयात
पाण्यासाठी येतात.
इकडून येणाऱ्या वाटसरांनो
आपली पायताणं काढून ठेवा बरं
आणि कपडे... तेही काढून ठेवा.

इथून पुढे निसटायचं ते कपड्यानिशी नव्हे तर
दरीतून घुमणाऱ्या वाऱ्यासरशी...

एक दिवस मला स्वप्न पडलं आपण
आपल्या कवितेचं भाषांतर
आपल्याच भाषेत करतोय म्हणून.

तसं म्हटलं तर आपण सर्वच
एकेक कविता आपापल्या खासगी भाषेत
अनुवादित असतो. मग व्हायचीच
भांडणं तिच्या अर्थाबद्दल आपल्यात.

बाबेलचा मनोरा कधी
पुरा होईलसं मला तरी दिसत नाही. ■

(मूळ मलयालम भाषेतील कवितेच्या ए०वे० रामकृष्णन यांनी केलेल्या इंग्लिश अनुवादावरून केलेला मराठी अनुवाद : अशोक रा० केळकर)

('भाषा आणि जीवन', ४:३, पावसाळा, १९८६, पृ० २६-२७)

**टीप :** के० सच्चिदानंद यांना यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठातर्फे कुसुमाग्रज राष्ट्रीय पुरस्कार २८ फेब्रुवारी २०१२ला प्रदान करण्यात आला.

## मराठी आणि बंगाली म्हणींचे नाते

मराठीमध्ये लहानाने ज्येष्ठाची भाषा वापरली तर आपण म्हणतो 'लहान तोंडी मोठा घास घेणे.' बंगालीतही 'छोटो मुखे बोडो कथा' या म्हणीने हा अर्थ व्यक्त होतो. आपल्या आजूबाजूच्या लोकांशी मिसळून वागायचा संदेश 'पाण्यात राहून माशाशी वैर'मध्ये दिसतो. तर बंगालीत मगरीला उल्लेखून तोच संदेश मिळतो. 'जोले थेके कुमीरेर शोंगे बाद' (कुमीर म्हणजे मगर). पाच जणांकडून एकच मत आले तर त्याची 'पाचामुखी परमेश्वर' म्हणून आपण संभावना करतो. तशीच ती 'दशेर बाणी देवरे बाणी' (दहाची वाणी देववाणी) मध्ये होते. मराठी माणूस दुधाची तहान ताकावर भागवतो. तशीच ती बंगालीत 'दुधेर साध घोले मेटानो' या म्हणीने भागविली जाते.

[ रमेश महाजन, 'लोकसत्ता', १५ जून २०१० ]

# १. महाबँक पुरस्कार वितरण-समारंभ

रंजना फडके

मराठी अभ्यास परिषद व बँक ऑफ महाराष्ट्र यांच्या संयुक्त विद्यमाने उत्कृष्ट भाषाविषयक लेखनासाठी दिला जाणारा वर्ष २०११चा महाबँक पुरस्कार दि० २१ जानेवारी २०१२ला देण्यात आला. धन्वंतरी सभागृह, पुणे येथे झालेल्या समारंभात शिक्षणतज्ज्ञ रमेश पानसे, यांच्या शुभहस्ते माधुरी पुरंदरे यांना 'लिहावे नेटके' (जोत्स्ना प्रकाशन, पुणे, २०१०) या पुस्तकासाठी पुरस्कार देण्यात आला. अध्यक्षस्थानी मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे होते.

डॉ० प्रमोद तलगेरी, डॉ० विनायक गंधे व विजया चौधरी (निमंत्रक) या निवड-समितीने एकमताने या पुस्तकाची निवड केली असून पुरस्काराचे स्वरूप ₹ ५०००/- व प्रमाणपत्र असे आहे.

मराठी अभ्यास परिषदेचे कार्यवाह प्रा० आनंद काटीकर यांनी प्रास्ताविकात परिषदेच्या नवीन उपक्रमांची माहिती देताना महाबँक पुरस्कारामागील भूमिका सांगितली. निवडसमितीचे सदस्य विनायक गंधे यांनी 'लिहावे नेटके' या पुस्तकातील बलस्थानांचे सोदाहरण विवेचन केले.

पुरस्काराला उत्तर देताना माधुरी पुरंदरे यांनी मराठी अभ्यास परिषदेचे आभार मानले. त्या म्हणाल्या, ''वनस्थळीच्या माध्यमातून मुलांसाठी कार्य करीत असताना भाषेशी वेगवेगळ्या वाटांनी अधिक जवळून संबंध येत गेला. त्यातूनच हे पुस्तक लिहिण्याची प्रेरणा मिळाली आणि मी हे धाडस केले. त्यांची दखल मराठी अभ्यास परिषदेने घेतल्यामुळे आपण केलेले काम योग्य दिशेने टाकलेले पाऊल आहे हे जाणवले.''

प्रमुख पाहुणे शिक्षणतज्ज्ञ रमेश पानसे यांनी आपल्या मनोगतामध्ये समाजातील भाषा शिक्षणाची अवस्था, भाषेच्या समृद्धीपर्यंतचा प्रवास याबद्दल मौलिक विचार व्यक्त केले. बालशिक्षणातील ज्ञानरचनावादी शिक्षणपद्धतीविषयीही त्यांनी विवेचन केले.

अध्यक्षीय मनोगतामध्ये प्र०ना० परांजपे यांनी माधुरी पुरंदरे यांचे अभिनंदन केले. ते म्हणाले, ''भाषा शिकताना आनंद व्हायला हवा. तो आनंद हे पुस्तक देते. शिवाय नव्याने मराठी शिकणाऱ्या उत्साही विद्यार्थ्यांसाठीही हे पुस्तक अत्यंत मार्गदर्शक आहे. पालकांनी हे पुस्तक बारकाईने वाचावे असे आहे.''



अनुक्रमणिका

कार्यक्रमाचे सूत्रसंचालन विजया चौधरी यांनी केले. आनंद काटीकर यांनी आभार मानले. या पुस्तकाला पुरस्कार मिळाल्यामुळे योग्य पुस्तकाची दखल घेतली गेल्याचे समाधान उपस्थितांनी व्यक्त केले. ■

# २. मराठी भाषादिनानिमित्त परिसंवाद

मराठी भाषा दिनाचे औचित्य साधून मराठी अभ्यास परिषद आणि फर्ग्युसन महाविद्यालयातील मराठी विभाग यांनी संयुक्तपणे २७ फेब्रुवारी २०१२ रोजी एका परिसंवादाचे आयोजन फर्ग्युसन महाविद्यालयाच्या दृक्‌श्राव्य सभागृहात केले होते. परिसंवादाचा विषय होता : शब्दकोशांची निर्मितिप्रक्रिया. परिसंवादात डॉ० मिलिंद मालशे, डॉ० माधवी कोल्हटकर, श्री० दामोदर घाणेकर आणि परिसंवादाचे अध्यक्ष डॉ० रामदास डांगे यांचा सहभाग होता. डॉ० सिद्धार्थ आगळे आणि डॉ० कृष्णा किरवले यांनी निमंत्रितांचे स्वागत केले.

मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे यांनी शब्दकोशांच्या निर्मितीचे महत्त्व प्रतिपादन करून त्यासाठी सामाजिक संस्थांनी एकत्र येण्याचे आवाहन केले. परिसंवादाचे अध्यक्ष मराठी शब्दकोशकार डॉ० डांगे यांनी कोशाचे काम सकारात्मक भूमिकेशिवाय होऊ शकत नाही. मराठी भाषेला ज्ञानभाषा करताना शब्दकोशांचा विचार अपरिहार्यपणे व्हायला हवा, असे मत व्यक्त केले. डॉ० मालशे यांनी इंग्लिश भाषेतील कोशरचनेचा प्रारंभ, शब्दकोशांचे प्रकार, संगणकीय कोशरचना, आधुनिकतेशी असणारे कोशांचे नाते याविषयी अत्यंत मुद्देसूद प्रतिपादन केले. डॉ० कोल्हटकर यांनी मोनिअर विल्यम्स, वा०शि० आपटे यांसारख्या संस्कृत कोशकारांचा संदर्भ देऊन कोश ही कशी अखंड चालणारी प्रक्रिया आहे, हे स्पष्ट केले. श्री० घाणेकर यांनी आपला मुद्रितशोधक, अनुवादक ते कोंकणी भाषेचा कोशकार हा प्रवास सहजपणे मांडला.

या निमित्ताने मराठी, इंग्रजी, संस्कृत आणि कोंकणी या भाषांमधील विविध कोशांबाबत चर्चा झाली. अनेक भाषातज्ज्ञ याप्रसंगी आवर्जून उपस्थित होते. या परिसंवादाच्या शेवटच्या टप्प्यावर श्रोत्यांनी विचारलेल्या प्रश्नांना उत्तरे देण्यात आली. प्रा० काटीकर यांनी आभार मानले.

■

## भाषाविषयक लेखनसूची : २०११

-शशिकांत पवार

(टीप : ही सूची परिपूर्ण नाही याची आम्हांला जाणीव आहे. वाचकांनी आपल्या वाचनात आलेले संदर्भ कळवून ही सूची पूर्ण करण्यास हातभार लावावा अशी विनंती आहे. - संपादक)

### (अ) नियतकालिकांतील लेख

**अभ्यं**कर, शंतनू / माझे मराठीचे प्रयोग/ अंतर्नाद फेब्रुवारी/पृ० १६-१८

**आग्रे**, संतोष/न्याय व्यवहारात मराठी : उपेक्षा आणि अपेक्षा/आजचा सुधारक नोव्हेंबर /पृ० ३४५ ते ३५२

**आव**लगावकर, अविनाश/मराठी भाषेचे प्रारंभिक / लोकराज्य - ऑक्टोबर/पृ० २६-२८

**ओझ**रकर, ज्योतिका/मराठीपणाचे मूळ/ कालनिर्णय दिवाळी / पृ० ५२ व २०४ ते २०८

**काळे**, कल्याण/उत्पत्ती आणि विकासाचे टप्पे/ लोकराज्य - ऑक्टोबर/पृ० २३ ते २५

**काळे**, रावसाहेब मु० - दृष्टान्तपाठात आढळणारे वऱ्हाडी बोलीतील शब्द/ अक्षरगाथा ऑक्टो-डिसें/ पृ० ५९-६४

**कुल**कर्णी, द०श्री० /होय, मराठी भाषा सौजन्यपूर्ण आहे!/ साहित्य मैफल दिवाळी/पृ० १५८-१५९

**कुल**कर्णी, संपदा/भाषेचा अपूर्व आविष्कार पासोडी/लोकराज्य - ऑक्टोबर /पृ०१९

**कुल**कर्णी, मेधा/ मराठी विकिपीडियावर तुमचे स्वागत असो/'रुची' - डिसेंबर/ पृ० ५-७

**कुल**कर्णी, श्री० रं०/'शब्दविषयक वैदिक संकल्पना आणि ज्ञानेश्वरी'/पंचधारा-जाने-मार्च /पृ० ५-२१

**कुळ**कर्णी, सलील/हिंदी वाक्यम् प्रमाणम्/ अंतर्नाद फेब्रुवारी /पृ० ११-१५

**खाना**पूरकर, राममोहन/माहिती तंत्रज्ञानात मराठी/आजचा सुधारक नोव्हेंबर / पृ० ३५५-३६३

**गाय**कवाड, विनोद/कन्नड-मराठी भाषिक संबंध : विविध पातळ्यांवरील आंतरछेद/ सक्षम समीक्षा जुलै-सप्टें/पृ० २२-२६

**गोख**ले, शरद रामचंद्र/ ज्ञानभाषा मराठी/लोकराज्य-ऑक्टोबर/पृ० ५४-५५

**गोरे**, अनिल/मराठीमुळे कार्यक्षमता वाढेल/ किर्लोस्कर-सप्टेंबर /पृ०५४-५५

**गोवि**लकर, लीला/एकाच अंगणात बहरलेल्या वेली/लोकराज्य-ऑक्टोबर/ पृ० ३६-३८

**चु**नेकर, जयवंत/अमराठी भाषकांना मराठी शिकवताना/लोकराज्य-ऑक्टोबर/पृ० ६२-६३

**जा**धव, रा०ग०/समाज आणि भाषा/लोकराज्य-ऑक्टोबर/पृ० ४१-४२

**जो**शी, मीना/शब्द : भाषेचे वैभव - श्री गजानन आशिष-सप्टेंबर /पृ०४३-४४

**त्रि**भुवन, शैलेश/मराठी भाषा, प्रबोधन आणि समाजस्वास्थ्य : एक चिंतन/सक्षम समीक्षा-जुलै-सप्टें /पृ० ७६-८४

**थो**रात, हरिश्चंद्र/तत्त्वज्ञान आणि समीक्षा : मराठी भाषेचा वापर, वस्तुस्थिती आणि अपेक्षा/मुक्तशब्द-मे /पृ० १३-१८

**द्वा**दशीवार, सुरेश/वैश्विकता आणि आत्मग्रस्तता/लोकराज्य-ऑक्टोबर /पृ० ४९-५१

**दे**शपांडे, अ०पां०/विज्ञान, तंत्रज्ञान आणि मराठी भाषा/अंतर्नाद-सप्टेंबर /पृ० ३८-४१

**धों**गडे, रमेश वा०/मराठीची ध्वनी व्यवस्था/लोकराज्य-ऑक्टोबर/पृ० ३९-४०

**न**रके, हरि/मराठी अभिजात कशी?/लोकराज्य-ऑक्टोबर /पृ० ९-१४

**प**रब, प्रकाश/मराठी भाषा आणि शुद्ध-लेखन/अक्षर-संवेदना दिवाळी २०११/पृ० १०८-११

**प**रब, प्रकाश/व्यवहार क्षेत्रांतील मराठी/लोकराज्य-ऑक्टोबर/पृ० ५६-५७

**प**वार, दत्ता/मराठी भाषेचे 'अर्थ'कारण आणि राजकारण/आजचा सुधारक-ऑक्टोबर /पृ० २९९-३०४

**प**वार, सुभाष/मराठी (प्रादेशिक) भाषा आणि जाहिरातीची सामाजिक व आर्थिक बाजू/सक्षम समीक्षा-जुलै-सप्टें /पृ० ४८-५१

**पा**टणकर, जयश्री/सामाजिक भाषा विज्ञान/लोकराज्य-ऑक्टोबर/पृ० ३१-३२

**पा**टील, चंद्रकांत/भाषेबद्दल/नवअनुष्टुभ मे-जून /पृ० ६-१०

**ब**र्नसन, मॅक्सिन/मराठी भाषेचे तारक कोण? मारक कोण?/संवेदना (महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे) दिवाळी/पृ० ५८-६०

**बे**न्नूर, फकीरुद्दीन/मराठी भाषा आणि मुसलमान/आजचा सुधारक-नोव्हेंबर /पृ० ३२५-३३१

**भि**डे, प्रदीप/भाषा संवर्धनाचे स्तुत्य प्रयत्न-अमृतवेल/अंतर्नाद-जून /पृ० ४१-४३

**म**राठे, कालिदास बा०/ज्ञानभाषा मराठी/आजचा सुधारक-नोव्हेंबर/पृ० ३४५-३५२

**म**हाजन, श्री०द०/मराठी माध्यम आणि महाराष्ट्र/अंतर्नाद-फेब्रुवारी/पृ० २३-२६

**मा**वळणकर, विनय/मराठी भाषा व संगणक/अंतर्नाद-फेब्रुवारी/पृ० १९-२२

**मु**खेडकर, राजेश/मराठी भाषेतील चातुर्वर्ण्य व्यवस्था/अक्षरगाथा-ऑक्टो-डिसें/पृ० २४-३४

**मो**रवंचीकर, श०श्री०/अभिलेखातील मराठी /लोकराज्य-ऑक्टोबर/पृ० २०-२२

**मो**हनी, अनुराधा/राजभाषा ही लोकभाषा बनली/आजचा सुधारक-नोव्हेंबर/पृ० ३४१-३४४

## (आ) विशेषांकांतील लेख

**(१) 'अभिज्ञान' (भाषासंस्कार विशेषांक) अभिज्ञान अकादमी, मुंबई. जून २०११**

## (२) 'अंतर्नाद' दिवाळी २०११ - 'मराठीपण जपणे म्हणजे काय?'

**कु**ळकर्णी, सलील/ आपल्या आईचा मान आधी आपण राखलाच पाहिजे/पृ० १७-२२

**गां**गल, दिनकर/फुटीर अस्वस्थ महाराष्ट्र/ पृ० ३७-४२

**गुं**डी, नीलिमा/मराठीपण : केंद्रबिंदू कायम ठेवून विस्तारणारे वर्तुळ/पृ० १४-१५

**दा**भोलकर, दत्तप्रसाद/ मराठीपण म्हणजे नक्की काय ? आणि ते जपायचे कसे काय? /पृ० ५९-६३

**नि**गळे, भूषण/मराठीजनांना जोडणारे महाजाल /पृ० ४६-५०

**बा**रलिंगे, भाग्यश्री /अमेरिकेतील मराठीपण/पृ० ४३-४५

**मु**ळे, ज्ञानेश्वर/मराठीपणाचे वैश्विक आयाम/पृ० २३-२६

**स**हस्रबुद्धे, विनय/कशासाठी 'मी मराठी'? /पृ० २७-२८

**सा**वंत, विवेक/भाषा नव्हे, मराठी मानसिकता कालानुरूप व्हायची गरज आहे /पृ० ५१-५८

## (इ) पुस्तके

**क**हाते, अतुल/ 'च'ची भाषा/मनोविकास, पुणे.

**कु**लकर्णी, म०वा०/शब्दचर्चा/मेहता प्रकाशन, पुणे.

**भृ**गुवार, सुरेश/मर्ढेकरांची काव्यशैली/ काँटिनेंटल, पुणे/ २०११

**सा**रंग, विलास/भाषांतर आणि भाषा/ मौज प्रकाशन गृह, मुंबई.

### मराठी विकिपीडिया

मराठी विकिपीडिया १ मे २००३ रोजी सुरू झाला. जगातल्या प्रत्येक भाषेतलं ज्ञान मराठीत आणि मराठीतलं ज्ञान जगातल्या प्रत्येक भाषेत मुक्तपणे उपलब्ध व्हावं हा मराठी विकिपीडियाचा उद्देश आहे. हे विचार आणि त्यासाठीचे प्रयत्न खूप उदात्त आहेत यात शंकाच नाही. मुळात कोणत्याही माहितीवर एखाद्या व्यक्तीची/समूहाची मालकी असू नये आणि माहितीचं भांडार प्रत्येकासाठी खुलं असावं असं लोकशाहीचं तत्त्व या विचारामागे आहे. आणि नव्या तंत्रज्ञानामुळे ही लोकशाही वास्तवात यायला सुरुवातही झाली आहे. फक्त माहितीकोशच नाही; तर आता विकीभाषा असा लोकांचा शब्दकोशही सुरू झाला आहे. आपण सर्वांनी या सर्व माध्यमांमध्ये योगदान केलं पाहिजे.

[ मेधा कुलकर्णी, 'रुची', डिसेंबर २०११ ]

## भाषा आणि जीवन : लेखनसूची : २०११

-विजय पाध्ये

(टीप : नोंदीचे सदरांतर्गत वर्गीकरण स्वतंत्ररीत्या दिले असल्यामुळे येथे सदरांचा उल्लेख केलेला नाही. - संपादक)

**आ**चार्य, मा०ना० / यमलार्जुन/१.८

**ए**मिनो, एस०बी०/मालशे, मिलिंद, भट, विवेक/भारत - एक भाषिक क्षेत्र/४.२५

**का**टीकर, आनंद/संज्ञापन : वनस्पतींचे / २:३

**का**व्हार्लो, सिसिलिया/ऑलिव्हच्या झाडाला तुळशीची पाने/३.२२

**को**ल्हटकर, अरविंद/हिंदुस्थानची इंग्रजी भाषेला देणगी-चार अल्पपरिचित शब्द/ १.४४

**को**ल्हटकर, अरविंद/घोडे पेंड खाते/३.६३

**खो**पकर, अरुण/साहित्यकृतीचे माध्यमान्तर/ ४.९

**गुं**डी, नीलिमा/लॅटिन नव्हे; पोर्तुगीज व फ्रेंच संस्कार (बोरकर-काव्यसमीक्षा (१९३७ ते २००८))/४.६३

**गुं**डी, नीलिमा/अभ्यासकांची सोय (बालकवी, बा०भ० बोरकर - संदर्भ-सूची)/ ४.६५

**गुं**डी, नीलिमा/सार्वजनिक कार्यक्रमांतील भाषेचा वापर/१.३

**गुं**डी, नीलिमा/भाषा आणि जीवन (त्रै०) २०१० : लेखनसूची/१.७४

**गुं**डी, नीलिमा/सर्वस्पर्शी वास्तवाचा वेध (माझ्या वर्तमानाची नोंद -पी० विठ्ठल)/ ३.५२

**गु**जर, सोनाली/युनिकोड कार्यशाळा/ ४.७९

**चौ**धरी, कृष्णा/नवअलौकिकतावादाची कैफियत/२.६७

**जो**गळेकर, हेमंत/ मराठी कवितेतील आधुनिकतेची परिभाषा/२.३८

**जो**गळेकर, हेमंत/ मराठी कविता : प्रमाणभाषा बोलीभाषेकडे/१.१५

**जो**गळेकर, हेमंत/ पाच कवितासंग्रह (झाडातल्या कविता - शंकर सखाराम. पाढा - केशव सखाराम देशमुख; चालणारे अनवाणी पाय - केशव सखाराम देशमुख; शरणागताचे स्तोत्र - शशिकांत शिंदे; चिंगूरनंतरच्या कविता - शिवाजी नामगवळी)/३.४८

**जो**शी, सुरेश; मराठी कवितेतील आधुनिकतेची परिभाषा/३.६९

**ढ**वळीकर, म० के०/अभ्यासकांसाठी मोलाचे भाषांतर (भारतीय लेखनविद्या - दिनेशचंद्र सरकार; मराठी भाषांतर - शोभना गोखले)/१.५९

**दे**व, सदाशिव/अभिजात भाषांच्या निमित्ताने/३.३५

**दे**वळेकर, सुशान्त/वर्णक्रम आणि ऱ्/ २.६२

| टीकेविना | ज्याची त्याची प्रचीती |
|---|---|
|  |  |

## दखलयोग्य



## संपादकीय

लेख

## पुस्तक परीक्षण



## मुखपृष्ठ



## सूची

## परिषद वार्ता



## प्रतिसाद



## साभार पोच



## पानपूरके



## लेखक परिचय

# ‘अद्ययावत मराठी शब्दकोशाची निकड’विषयी

माधवी कोल्हटकर

[ *संदर्भ : भाषा आणि जीवन, दिवाळी २०११ (वर्ष २९, अंक ४)मधील अनघा भट यांचा लेख.*]

‘अद्ययावत मराठी शब्दकोशाची निकड’ या लेखात पृ० ५४ वर (१) मध्ये लेखिकेने म्हटल्याप्रमाणे ‘गुप्तचर’ हा शब्द मोल्सवर्थ देत नाहीत हे खरे आहे. त्यांच्या कोशात त्यांनी यासाठी ‘गुप्तदूत’ आणि ‘हेर’ असे शब्द दिले आहेत.

त्यांनी ‘गुप्तचर’ हा विशेषण म्हणून वापरला जातो, असेही म्हटले आहे. त्यासाठी ‘गुप्तचर संस्था’ ‘अमेरिकी गुप्तचर संस्थेचा अहवाल’ अशी उदाहरणे दिली आहेत; पण लेखिका म्हणत आहे, त्याप्रमाणे हे जर विशेषण मानले तर ‘गुप्तचर संस्था’ याचा अर्थ ‘गुप्तपणे हिंडणारी संस्था’ असा होईल!

चर हा शब्द संस्कृतमध्ये विशेषणाप्रमाणेच नामही आहे. नाम म्हणून येणारा त्याचा अर्थ spy, secret emissary असा आहे. म्हणजेच गुप्तचर संस्था याचा अर्थ गुप्तचरांची म्हणजेच गुप्तहेरांची संस्था असा होईल. तो कर्मधारय म्हणजे विशेषणविशेष्य असा समास नसून दोन नामांचा षष्ठीने संबंध दाखवणारा षष्ठी तत्पुरुष समास होईल.

तसेच गीतरामायणातील ‘तुझे गुप्तचर येऊन नच का वार्ता ही सांगती’ इथे तर उघडपणेच ते नाम आहे. लेखिका म्हणते त्याप्रमाणे तो शब्द विशेषण मानला तर त्यासाठी नाम कोणते घ्यायचे; असा प्रश्न पडतो.

पृष्ठ ५७ वरील मुद्दा क्रमांक ५.१ विशेषणे व क्रियाविशेषणे यात, ‘वरचेवर विध्यर्थ किंवा प्रेडिकेटिव्ह म्हणून वापरले गेलेले विशेषण कालांतराने भाषेत क्रियाविशेषण म्हणून स्थिरावू शकते. तसेच ‘होणे’ व ‘असणे’ ह्या विध्यर्थाच्या नमुनेदार (टिपिकल) क्रियापदांखेरीज इतरही क्रियापदांबरोबर ते वापरले जाते. जसे :

(अ) अस्पष्ट अक्षर; मला अस्पष्ट दिसते.

(आ) अथक प्रयत्न; प्रक्रिया अथक चालू आहे.

(इ) वेगळा पर्याय; तो वेगळा राहू लागला.

यात (अ)मध्ये ‘मला अस्पष्ट दिसते’ या वाक्याचा अस्पष्ट अक्षराशी संबंधच नाही. जर ‘मला अक्षर अस्पष्ट दिसते’ असे वाक्य असते तरी ते विशेषणच राहील, क्रियाविशेषण नाही. प्रस्तुतच्या वाक्यात ते स्वतंत्रपणे क्रियाविशेषण आहे. (आ) मधल्या



अनुक्रमणिका

उदाहरणात थोडी संशयाला जागा आहे, पण (इ) मध्ये 'तो वेगळा राहू लागला,' हा विशेषणाचा विध्यर्थी वापरच म्हणायला हवा. क्रियाविशेषण नव्हे.

लेखिकेने पुढे म्हटले आहे, ''शब्दकोशांमध्ये विशेषणे म्हणून नोंदवलेले; परंतु व्यवहारात बव्हंशी क्रियाविशेषणे म्हणूनच वापरले जाणारे दोन शब्द म्हणजे 'शक्य' आणि 'कबूल'. 'शक्य' क्रियाविशेषण म्हणून होणे, असणे, करणे अशा अनेक क्रियापदांसोबत वापरले जाते. याचा वापर गुणवाचक (ॲट्रिब्युटिव्ह) विशेषण म्हणून केलेला वापर प्रचलित मराठीत तरी फारसा आढळत नाही.''

हे विधान बरोबर वाटत नाही. उदा० 'म्हणूनच हे सारे शक्य झाले' या वाक्यात ते विध्यर्थी विशेषण आहे खरे; पण 'शक्य ते सारे प्रयत्न करून झाल्यावर' अशासारख्या वाक्यात ते गुणवाचक (ॲट्रिब्युटिव्ह) म्हणूनही वापरलेले दिसते.

'कबूल' हे मूळ फार्सी किंवा अरेबिक असल्याने मी त्यासंबंधी काही सांगू शकत नाही.

५.२ विशेषणे व नामे; या विषयासंबंधी लिहिताना संस्कृतकडे वळल्यावर काही मराठीप्रेमी आणि संस्कृतविरोधक कदाचित नाराज होतील. पण तरीही इथे नोंद होणे महत्त्वाचे आहे. संस्कृतमध्ये विशेषण हा वेगळा गट मानलेला नाही. यास्काचार्यांनी त्याची नामातच नोंद केली आहे. अगदी पीत, नील अशा शब्दांच्या बाबतीतसुद्धा. ती जर नामाशिवाय आली असतील तर ती नामरूपेच असतात. जर ती कुठल्या नामाबरोबर असतील आणि त्या नामाविषयी काही जास्त माहिती सांगत असतील, तर ती विशेषणे ठरतात.

आणखी एक मुद्दा इथे सांगावासा वाटतो. विशेषणाचे नाम बनण्याची प्रक्रिया बऱ्याच भाषांत असावी. इंग्रजीतील gift, dessert ही अशी काही उदाहरणे आहेत.

५.३ वाट चुकणे, रस्ता चुकणे, चित्रपटाची सुरुवात चुकणे असे नुसते मूळ वाक्प्रचार देऊन स्पष्टता येणार नाही. त्यासाठी त्यांचा वाक्यात उपयोग केला तरच त्या चुकण्याचे व्याकरण चूक की बरोबर हे सांगता येईल, तो वाट चुकला, ....रस्ता चुकला, .... गणित चुकला इथे चुकणे हे सकर्मक होईल. पण चित्रपटाची सुरुवात चुकली किंवा शेवट चुकला इथे वेगळा विचार करावा लागेल. तिथे हे क्रियापद अकर्मकच ठरेल. खेरीज इथे अयोग्य असणे आणि हुकणे हे दोन्ही अर्थ संभवनीय आहेत, याचीही नोंद घ्यावी लागेल.

'रागावणे' या क्रियापदाविषयी लिहिताना 'तुला कोणी रागावलं का?' इथे रागावणे हे क्रियापद सकर्मक आहे, असे लेखिका म्हणते. पण हे बरोबर नाही. 'तो रागावला' आणि 'शिक्षक त्याला रागावले' या दोनही वाक्यांत 'रागावणे' अकर्मकच आहे; पण त्या क्रियापदाचे अर्थ वेगळे आहेत. एकात 'to be angry' असा तर दुसऱ्यात 'to

scold' म्हणजे रागावून बोलणे असा अर्थ आहे. त्यामुळे 'तुला कोणी रागावलं का?' या वाक्यात 'तुला' ही द्वितीया न होता चतुर्थी विभक्ती होईल. सांगणे, बोलणे, निवेदन करणे या अर्थाच्या क्रियापदांबरोबर येणारी, ज्याला सांगायचे त्याची चतुर्थी.

५.४ ऊन कृदन्त व क्रियापद. यात लेखिकेने 'करून टाकणे', 'मरून जाणे', 'फेकून देणे' ही उदाहरणे घेतलेली आहेत. याचा जास्त विचार व्हायला हवा. 'करून ये' यातील ऊन कृदन्त आणि क्रियापद आणि 'करून टाक' यातील ऊन कृदन्त आणि क्रियापद यात फरक आहे. तो स्पष्ट करून या जोड क्रियापदांचा विचार केला जावा.

लेखिकेने हाती घेतलेले काम अतिशय महत्त्वाचे आहे, यात शंकाच नाही. त्यांचा मराठी - रशियन - जर्मन असा त्रैभाषिक कोश पूर्णही होत आला आहे. त्यांना त्यांच्या या कार्यासाठी मनापासून शुभेच्छा. त्याचप्रमाणे कोशनिर्मितीचे त्यांचे हे काम इथेच न थांबता त्या लगेचच मराठी-इंग्रजी अद्ययावत शब्दकोशाचे काम हाती घेतील आणि मराठीबाबतीत ही त्रुटी दूर करतील अशी आशा व्यक्त करते. ■

टपाल-पत्ता : 885/3, भांडारकर रस्ता, डेक्कन जिमखाना, पुणे 411 004.
स्थिरभाष : (020) 2565 3669 चलभाष : 097673 56127

प्रतिसाद

# हिवाळा २०१२च्या निमित्ताने

ओम देशमुख

संदर्भ : अंक - हिवाळा २०१२, (वर्ष ३०, अंक १)

(१) पृष्ठ क्र० ७४ पाहावे. चुकांची दुरुस्ती -
बहुदा (चूक) बहुधा (बरोबर). एकदा, दोनदा, अनेकदा, बहुदा.
एक + आधा = एखादा. एखादा (एक - आध बार - हिंदी)
कृपया संभ्रम दूर करावा, ही विनंती.

(२) तसेच मुखपृष्ठामागील पानावर 'एरण्डवणे' असा पत्त्यामध्ये उल्लेख आहे. मात्र मलपृष्ठावर 'एरण्डवन' असा आहे.

(३) अठरा विश्वे - अठरा विसवे १८ × २० = ३६० मराठी महिन्यात (भारतीय कालगणना) केवळ ३० दिवस असतात. १२ × ३० = ३६० दिवस अर्थात संपूर्ण वर्षभर दारिद्र्य. हे तर्कसंगत वाटते.

**खुलासा :** 'बहुधा' हे क्रियाविशेषण बरोबर आहे. पाहा : 'मराठी शब्दलेखन कोश' प्रा० यास्मिन शेख, मनोविकास प्रकाशन, पुणे, २००७, पृ० २१८.

संपादक

■

लेखक-परिचय

■ **आचार्य, माधव नारायण :** एम०ए०, मराठीचे निवृत्त प्राध्यापक. 'अनुषंग' (१९८१), 'मराठी व्याकरण विवेक' (१९९०, २००१), (महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक), 'ज्ञानमयूरांची कविता' (१९९३), 'आर्याभारत : नवदर्शन' (१९९७) ही पुस्तके प्रकाशित. 'मोरोपंतांची सतिगीते' (१९८५, १९९४), 'मोरोपंत विरचित संशयरत्नावली (१९८५), 'मोरोपंतकृत श्लोककेकावली' (१९९४) या पुस्तकांचे संपादक. पैकी शेवटच्या पुस्तकास महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक सभेचे पारितोषिक. 'पंचपदवी ज्ञानदेवी' या ग्रंथाला महाराष्ट्र शासन पुरस्कार व संत साहित्य पुरस्कार. 'ध्वनिताचें केणें' या ग्रंथाला मराठी अभ्यास परिषदेचा पुरस्कार.
टपाल-पत्ता : मु० व पोस्ट चौल, ता० अलिबाग, जि० रायगड 402 203.
स्थिरभाष : (0214) 240 362.

■ **गंधे, विनायक :** एम०ए०, पीएच०डी० निवृत्त मराठी विभाग प्रमुख. डी०बी०जे० महाविद्यालय, चिपळूण, ३७ वर्षे महाविद्यालयातील अध्यापन. लेखन 'सोपानदेवी' (संपादन, सहकार्याने), 'एकच प्याला' समीक्षा पर्व, 'एकच प्याला' : मराठी साहित्याचे वैभव. 'लंपनचं भावविश्व' (प्रकाश संत यांच्या कथांचा अभ्यास), महाराष्ट्र राज्य लोकसेवा आयोग स्पर्धापरीक्षांसाठी मराठी विषयाची दोन क्रमिक पुस्तके प्रसिद्ध.
टपाल-पत्ता : राधिका सहकारी गृहरचना संस्था, पर्वतीनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 030. स्थिरभाष : (020) 2425 1475.

■ **चौधरी,** विजया : मुंबई विद्यापीठातून एम०ए० (मराठी), पंजाब नॅशनल बँकेच्या अधिकार पदावरून स्वेच्छानिवृत्त. 'स्त्री-साहित्याचा मागोवा : इ०स० १८५० ते २०००'च्या तिसऱ्या खंडामध्ये भाग तसेच लेखिकासूची प्रकल्पात सहभाग.
टपाल-पत्ता : इ-503, गार्डन व्ह्यू, राधिका सोसायटी, पर्वतीनगर, सिंहगड रस्ता, पुणे 411 030.
स्थिरभाष : (020) 2425 0559, चलभाष : 099236 71820;
ई-पत्ता : vijayachaudhari11@gmail.com

■ **जोशी, सुहास भास्कर :** एम०कॉम०, एम०बी०ए०, एम०फिल, एलएल०बी०, पीएच०डी०, १९९२पासून 'गरवारे कॉलेज ऑफ कॉमर्स'मध्ये अध्यापन, 'मार्केटिंग मॅनेजमेंट' या विषयाचे प्रमुख. आठ पुस्तके प्रकाशित. पुणे विद्यापीठातर्फे 'बेस्ट कॉमर्स टीचर' पुरस्कार प्राप्त. ख्यातनाम चित्रकारांविषयी अनेक दिवाळी अंकांमध्ये लेख प्रसिद्ध. अनेक बहुराष्ट्रीय कंपन्या आणि महाविद्यालये यामध्ये ३००हून अधिक प्रशिक्षण कार्यक्रम व व्याख्याने.

टपाल-पत्ता : फ्लॅट क्र० 6, मयूर अपार्टमेंट्स, शुभश्री हॉस्पिटल गल्ली, कोथरूड, पुणे 411 038.
स्थिरभाष : (020) 2538 0072, चलभाष : 98225 56244,
ई-पत्ता : suhasbj@yahoo.com.in

■ **टण्णू, कीर्ती संदीप :** एम०एससी० (ऑर्गॅनिक केमिस्ट्री). 'विषय संप्रेषण' या विषयातील पीएच०डी०साठी प्रबंध यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठात दाखल. सध्या ॲनिमेटेड़ लघुमाहितीपटाच्या निर्मितीत कार्यरत.

टपाल-पत्ता : 301 डी रोलिंग हिल्स, सेमेंटिक कंपनीमागे, पाषाण, बाणेर लिंक रोड, पुणे 411 045. चलभाष : 083088 39710,
ई-पत्ता : kirtitannu@gmail.com

■ **देवधर, विद्या :** एम०ए०,एम०फिल०,पीएच०डी०, 'स्त्रीलिखित कादंबऱ्या : प्रेरणा आणि प्रवृत्ती' हा ग्रंथ प्रकाशित. पीएच०डी०च्या प्रबंधास उस्मानिया विद्यापीठाकडून सुवर्णपदक प्राप्त. 'भारतीय भाषांतील स्त्रीसाहित्याचा मागोवा' (खंड १ व २) या ग्रंथाच्या संपादनात सहभाग. कार्यवाह, मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश. 'पंचधारा'च्या संपादक मंडळ सदस्य.

टपाल-पत्ता : 301, कृष्णधाम अपार्टमेंट्स, 3-4-473, लिंगमपल्ली, नारायण गुडा, हैदराबाद 500 027.
स्थिरभाष : (040) 2756 4747, चलभाष : 094403 73777
ई-पत्ता : vidyadeodhar@gmail.com

■ **धडफळे, मो०गो० :** फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे ३८ वर्षे संस्कृत व पाली भाषांचे अध्यापन. टिळक महाराष्ट्र विद्यापीठात युरो-भारतीय भाषाविज्ञानाचे अध्यापन. अनेक इंग्रजी ग्रंथांचे व 'साहित्य सावित्री', 'पालि-बौद्ध संतसाहित्य', 'धर्मानंद कोसंबी : पालि-बौद्ध धर्माचे भाष्यकार' ह्यांसह अनेक मराठी पुस्तकांचे लेखक. सुमारे १५० शोधनिबंध प्रसिद्ध. इराण शासनातर्फे इराण भाषातज्ज्ञ म्हणून, तसेच जम्मू-कश्मीर विद्यापीठातर्फे मंजुश्री पुरस्कार देऊन गौरव.

टपाल-पत्ता : 2 'यशोदीप-ब', रामबाग वसाहत, सदाशिव पेठ, पुणे 411 030.
स्थिरभाष : (020) 2433 2081.

■ **पवार, शशिकांत बळीराम :** बी०ए०(मराठी), ग्रंथपालन प्रमाणपत्र परीक्षा व मोडी लिपी प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण.

टपाल-पत्ता : ग्रंथपाल साहाय्यक, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, संदर्भ विभाग, दादर मुंबई 400 014. चलभाष : 098693 77806.



अनुक्रमणिका

- **पाध्ये, विजय :** पुण्यातील तीन उद्योगसमूहांमध्ये विविध उच्च पदांवर ३२ वर्षे नोकरी. १९९८पासून विविध उद्योग समूहांच्या गृहपत्रिकांचे संपादन. अभियांत्रिकी, मानव संसाधन, औद्योगिक संबंध, विकृतिशास्त्र, दूरसंचार इ० क्षेत्रांतील दस्तऐवजांचे इंग्रजीमधून मराठीत भाषांतर करण्याचे स्वतंत्रपणे काम करतात.
टपाल-पत्ता : 4 चित्रा, 'बी', विद्यासागर सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.
स्थिरभाष : (020) 2441 1951, चलभाष : 098220 31963;
ई-पत्ता : v.wordsmith@gmail.com

- **पानसे, रमेश :** अर्थशास्त्राचे निवृत्त प्राध्यापक. शिक्षणतज्ज्ञ. ठाणे जिल्ह्यातील आदिवासी विकास व शिक्षणविषयक प्रयोग. अर्थशास्त्र, समाजशास्त्र व शिक्षण या विषयांत ग्रंथलेखन. २५हून अधिक स्वतंत्र व संपादित पुस्तके. 'शिक्षणवेध' मासिकाचे संपादक. 'बालशिक्षण संशोधन व विकासकेंद्र' या संस्थेचे संचालक. सामाजिक कार्यासाठी अनेक पुरस्कार व सन्मान प्राप्त. महत्त्वाचे ग्रंथ - 'शिक्षण - आनंदक्षण', 'कर्ता-करविता : आधुनिक मेंदूसंशोधन व आपले जीवन', 'शिक्षण : सामाजिक परिवर्तनाची चळवळ', 'नयी तालीम : गांधीप्रणित शिक्षणविषयक प्रयोगांचा इतिहास', 'रचनावादी शिक्षण' इ०
टपाल-पत्ता : 314, गंगापुरी, वाई, जि० सातारा 412 803.
चलभाष : 098812 30869.

- **फडके, रंजना :** एम०ए०,पीएच०डी०, वाडिया महाविद्यालयात मराठीचे अध्यापन. तीन काव्यसंग्रह प्रकाशित. पैकी दोन संग्रह ब्रेल लिपीत प्रकाशित. 'जीवनक्षण' काव्यसंग्रहाला गदिमा पुरस्कार. दोन वेळा आदर्श शिक्षक पुरस्कार. 'स्त्री-साहित्याचा मागोवा'मध्ये लेखन. साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या कार्यवाह.
टपाल-पत्ता : 'सायली', श्रीरंग हाउसिंग सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037.
स्थिरभाष : (020) 2421 0985 चलभाष : 093710 91442

- **मोडक, केतकी :** एम०ए०,एम०एड०,पीएच०डी०, गरवारे कॉलेज ऑफ कॉमर्समध्ये उपप्राचार्य. संत मुक्ताबाई यांच्या जीवनावरील 'कडकडोनी वीज निमाली ठायीचे ठायी' या पुस्तकाला अनेक पुरस्कार प्राप्त.
टपाल-पत्ता : ग्रेस, फ्लॅट क्र० 1, श्रीराम अपार्टमेंट्स, 243/8, शुक्रवार पेठ, पुणे 411 002. स्थिरभाष : (020) 2426 0520, चलभाष : 094210 16089;
ई-पत्ता : kmmodak88@gmail.com

- **राईलकर, मनोहर :** एम०एससी० (सांख्यिकी), मुंबई, एम०एससी० (गणित), पुणे, सर परशुरामभाऊ महाविद्यालय, पुणे येथे गणिताचे प्राध्यापक व गणित विभागप्रमुख असे एकूण ३४ वर्षांचे अध्यापनकार्य. गणित विषयावरील २३ पुस्तके, तीन कादंबऱ्या, सात विज्ञानकथा व 'भाषा व जीवन'मध्ये अनेक वेळा लेखन.
टपाल पत्ता : 'मृण्मयी', जेधे नगर, बिबवेवाडी, पुणे 411 037, स्थिरभाष : (020) 2422 0566; चलभाष : 0984220 67619; ई-पत्ता : railkar.m@gmail.com

